नवभारत Regd. No. M H 1332

# नवभारत

या अंकात –



वर्ष २७

अंक नववा

जून १९७४

रु. १–२५

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






प्राज्ञपाठशालामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष सत्ताविसावे अंक नववा

# नवभारत

जून १९७४

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. मे. पुं. रेगे का. संपादक



वार्षिक रु. १२ अंकास रु. १·२५

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशालामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता :

१ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
प्राध्यापकांचे निवासस्थान कीर्ति कॉलेज, दादर-मुंबई २८

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o दी प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमरावबाडी, मुंबई २ फोन नं. ३५४८५४

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशालामंडळ, वाई

तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी

# श्री शिवछत्रपतींची राज्यपद्धती*

ही राज्यपद्धती तत्त्वतः हिंदूंच्या राजनीतिशास्त्रात व धर्मशास्त्रात सांगितलेली राज्यपद्धती होती; ही गोष्ट हिंदूधर्मशास्त्राप्रमाणे शिवाजी महाराजांनी राज्याभिषेक करवून घेतला, यातच स्पष्ट सूचित होते. राज्याभिषेक-विधीमध्ये मी धर्मानुसारेच राज्यसत्ता चालवीन, कामतः म्ह० माझ्या लहरीप्रमाणे चालविणार नाही अशी प्रतिज्ञा पृथुवैन्य राजाप्रमाणे घ्यावयाची असते. परंतु शिवाजी महाराजांच्यापर्यंत सुमारे तीन शतके मुसलमानी अमदान्या व त्यांची विशिष्ट शासनपद्धती येथे दृढ झाली होती; त्या शासनपद्धतीतीलही काही महत्त्वाच्या बाबींचा स्वीकार शिवाजी महाराजांनी केला होता. पाश्चात्य राज्यशास्त्रात व राजकीय इतिहासात सांगितलेल्या कोणत्याही राज्यपद्धतीच्या प्रकारांमध्ये या राज्यपद्धतीचा तत्त्वतः अंतर्भाव करता येत नसला तरी एकाअर्थी प्लेटो व ॲरिस्टॉटल यांनी ज्या तीन प्रकारच्या आदर्श राज्यपद्धती सांगितल्या आहेत त्यातील न्यायनिष्ठ राजसत्तेशी ( monarchy शी ) या राज्यपद्धतीचे साम्य दाखविता येते. युरोपातील मध्ययुगीन ख्रिश्चन राज्यपद्धती किंवा प० आशियातील व हिंदुस्थानमधील मुसलमानी राज्यपद्धती ज्या विशिष्ट अर्थाने धर्मनिष्ठ होत्या त्या अर्थाने शिवाजी महाराजांची राज्यपद्धती धर्मनिष्ठ नव्हती. ख्रिश्चन राज्यपद्धती केवळ ख्रिश्चन धर्मच श्रेष्ठ मानते व अन्य धर्मास हीन मानते किंवा मुसलमानी राज्यपद्धती इस्लामलाच श्रेष्ठ मानते व अन्यधर्मास हीन मानते तशी हिंदूंच्या राजनीतिशास्त्रातील धर्मनिष्ठ राज्यपद्धती नाही. हिंदू धर्माप्रमाणे धर्म शब्दाच्या व्याख्येत सर्व परंपरागत सामाजिक व कौटुंबिक आचारपद्धतींचा समावेश होतो; त्यात मानवसमाजाच्या इतिहासातल्या उच्चनीच मानलेल्या धर्मसंस्थाही अन्तर्भूत होतात. म्हणून हिंदूंची राज्यपद्धती सर्व धर्मसमावेशक ठरते. म्हणूनच इतर धर्मांनाही त्यात मान्यता आहे. "परस्परे विरोध पावून नाशाते पावती, ऐसे न व्हावे, आपली सकल प्रजा निरुपद्रव होत जावी, धर्मपथप्रवर्तक असावी. या प्रजेचे करुणेस्तव ईश्वरे संपूर्ण कृपानुग्रहे आपणास राज्य दिलेले आहे. या ईश्वरआज्ञेस अन्यथा केलीयाने ईश्वराचा क्षोभ होईल, हे संपूर्ण भय चित्तात आणून राज्यमदारूढ न होता सार्वकाळ

---

* हा लेख संपादक 'सोनाली' यवतमाळ ( महाराष्ट्र ) यांच्या सौजन्याने येथे उद्धृत करीत आहोत. —का. सं.



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अप्रमत्त होऊन प्रजेचे हितकार्यी सादर असावे." (आज्ञापत्र, अर्थात शिवराजांची राजनीति, प्रकरण - ३ ). या आज्ञापत्रातील उक्तीमध्ये धर्माची व्याख्या दिली आहे. या व्याख्येप्रमाणे हिंदूधर्म, ख्रिश्चनधर्म, मुसलमानधर्म इत्यादी प्रस्थापित धर्मसंस्थांपेक्षा धर्मशब्दाचा प्रजांमध्ये परस्पर अविरोध राखणे हा व्यापक अर्थ स्पष्टपणे सांगितला आहे. या व्यापक अर्थामध्ये वरील प्रस्थापित धर्मसंस्थांचा सुद्धा अंतर्भाव होतो; पण विशेष असा की आज्ञापत्रात परंपरागत प्रस्थापित धर्म संपूर्ण मान्य न करता "परंपरागत जो उत्तम, वडील आचरत असतील तोच धर्म आचरोन जेणे करून कीर्तिलाभ होईल ते करावे" असे स्पष्ट सांगितले आहे.

या राजसत्ता-पद्धतीमध्ये राजाला परंपरागत सामाजिक व्यवस्थेमध्ये किंवा पवित्र चालीरीतींमध्ये म्हणजे कुटुंबसंस्थेच्या, जातिसंस्थेच्या किंवा वर्ण-संस्थेच्या नियमांमध्ये विशेष अपवाद सोडल्यास हस्तक्षेप करण्याचा अधिकार नाही. राजाला धर्माधर्म ठरविण्याचे किंवा त्यात परिवर्तन करण्याचे स्वातंत्र्य नाही. तो परंपरागत धर्मसंस्थांना जबाबदार आहे. कूळ व वंश यांच्या परंपरागत चालीरीती, जमातींचे आणि पंचायती, कारागीर व व्यापारी वर्गाच्या महाजन सभांचे संकेत यांचे परिपालन योग्य रीतीने होते की नाही या संबंधात दक्षता बाळगणे हेच राजाचे कर्तव्य ठरले होते.

शिवाजी महाराजांचा काल म्हणजे सतरावे शतक. या काळात सर्वधर्म-सहिष्णु राज्यपद्धती स्थापणे हे एक प्रकारचे जागतिक क्रांतिकार्य होते. मुसल-मान सुलतान इस्लामशिवाय इतर धर्मांना आणि ख्रिश्चन राजे ख्रिस्ती धर्माशिवाय इतर धर्मांना गौण व हीन लेखत; भिन्नधर्मीय प्रजांना समान दर्जाची रयत म्हणून मान्यता मिळत नव्हती; असा तो काळ होता. भिन्न-धर्मीय प्रजांमध्ये धर्मभेदानुसार पक्षपात न करणारे राज्य स्थापण्याचा प्रयत्न सतराव्या शतकाच्या मध्याला शिवाजी महाराजांनी केला ही तुलनात्मक ऐतिहासिक दृष्टीने अत्यंत पुरोगामी घटना ठरते. हिंदुस्थानातील मुसलमानी सुलतानशाह्या लहरीप्रमाणे हिंदुधर्माची अवहेलना करून हिंदू प्रजेला दुय्यम दर्जाने वागवीत. पोर्तुगीजांच्या राजवटीत हिंदूंना कसलाही राजकीय अधि-कार देणे अनिष्ट मानीत; एवढेच नव्हे तर, ख्रिश्चन मनुष्यावर अख्रिश्चन मनुष्याचा अधिकार चालणे अधर्म्य व अवैध मानीत. अशा काळात शिवाजी महाराजांनी नवे प्रदेश ताब्यात आल्याबरोबर भिन्नधर्मीय सर्व प्रजांना समान मान्यता देण्याचे कर्तव्य बजावले. मुसलमान काजी व ख्रिश्चन पाद्री यांना सन्मानाने वागविले, त्यांचे धर्मग्रंथ व पूजास्थाने सुरक्षित ठेवली.

धर्मरक्षण व प्रजारक्षण हे ईश्वरी आज्ञेने प्राप्त झालेले कर्तव्य आहे; आणि राज्यलाभ सुद्धा प्रजेचा संरक्षणकर्ता म्हणूनच ईश्वरकृपेने झालेला आहे;



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

व ईश्वरशरण होऊन राज्यकारभार करावा; अशी निष्ठा राजाच्या ठिकाणी असावी; असे जे आज्ञापत्रात म्हटले आहे त्याचे रहस्य वरीलप्रमाणे सांगता येते.

## अष्टप्रधानमंडळ

राज्याची विविध प्रकारची कार्ये पार पाडणे एकट्या राजास अशक्य असते व म्हणून कार्यविभागणी व अधिकारविभागणी करणे आवश्यक ठरते. यादृष्टीने अष्टप्रधानमंडळ ही संस्था शिवाजी महाराजांनी निर्माण करून आपल्या राज्यपद्धतीचे स्वरूप स्पष्ट केले. प्रधान म्हणजे हल्ली यास मंत्री किंवा सचिव म्हणतात तो. संस्कृतमध्ये प्रधान म्हणजे प्रमुख; मंत्री किंवा सचिव नव्हे. प्रधान शब्दाचा अमात्य, मंत्री किंवा सचिव हा अर्थ शिवाजीमहाराजांपूर्वीच्या संस्कृत वा प्राकृत साहित्यात नाही. अमात्य, बुद्धिसचिव व मन्त्री यांच्याहून व्यतिरिक्त वरिष्ठ शासनाधिकारी म्ह० कर्मसचिव असा प्रधान शब्दाचा अर्थ अमरकोशात सांगितला आहे. प्रधान हा शब्द कोणत्यातरी पर्शिअन शब्दाचा संस्कृत पर्याय असावा. हे प्रधान राजाचे राज्यकारभार चालविणारे प्रतिनिधी होत असे आज्ञापत्रात म्हटले आहे. म्हणजे त्यांनाही क्वचित अपवाद सोडता राजाचाच अधिकार प्राप्त होतो. प्रतिनिधी हा जो शब्द असा सामान्य अर्थी आज्ञापत्रात वापरला आहे तो या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा आहे. आठही प्रधान हे राजाचे प्रतिनिधी म्हणजे राजाचा अधिकार धारण करणारे लोक होत. यासच आज्ञापत्रात सरकारकून म्हटले असून नृपगुणतुल्यगुण, राजबंधू, राज्यलक्षणगृहाचे स्तंभ, (राजरूप)हस्तीचे अंकुश, राजपदजनित अन्यायसागराची मर्यादा, इत्यादी विशेषणांनी प्रतिनिधिपदाचा अर्थ स्पष्ट केला आहे. आज्ञापत्राच्या चौथ्या प्रकरणात प्रारंभीच अष्टप्रधानांची कर्तव्ये स्पष्ट केली आहेत, ती अशी: "राज्यामध्ये हुजरात गड किल्ले लष्कर हशम यांचा नियम करणे, प्रजा संरक्षणे, धर्माधर्म विचारून पाहणे, यथाकाली दान देणे, सेवक लोकांची केली वेतने पाववणे, समयाचे समयी प्रजेपासून करभार घेणे, संपादिले पदार्थांचा संग्रह करणे, नित्यानित्य राज्याचा आयव्यय पाहणे, स्थूल सूक्ष्म अतीत अनागत कार्य सुचोन त्या त्या कार्यानुरूप अगोदर त्याचा विचार योजणे, न्याय अन्याय पाहून यथाशास्त्र शासनाचा निश्चय करून शासन करणे, परचक्रादि अरिष्टांचा परिहार योजणे, देशोदेशी वार्तिक प्रेरून वर्तमान आणवणे, समयविशेषे शत्रूस संधिविग्रहउपेक्षा जे कर्तव्य त्याचा यथोचित विवेक करून तदनुरूप प्रवर्त करणे, आहे राज्य याचे संरक्षण करून नूतन संपादणे, अंतःपुरादि नाजूक नियम ते यथोचित रक्षणे, संभावितांचे मान वाढवून क्षुद्रांस नियमावरी ठेवणे, दैवते व दैवतैकनिष्ठ सुब्राह्मण यांचे प्रसाद संपादणे, अधर्मप्रवृत्ति मोडून, धर्माभिवृद्धि करून शाश्वतलोकाश्रयित होणे, इत्यादि ही नृपकार्येच आहेत, परंतु



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

केवळ नृपाने स्वतांच इतकाहि धंदा करीन म्हणतां होतो यैसे नाही. याकरिता हा सकल राज्यभार चालवावयाकारणे आपले प्रतिनिधि प्रधान करावे लागतात. प्रधानाविरहित राज्यभार चालत नाही. ”

अष्टप्रधानांची हुद्यांची नावे म्हणजे पदनामे अशी:– पेशवा म्ह० मुख्य प्रधान, मुजुमदार म्ह० अमात्य, सुरनिस म्ह० सचिव, वाकनिस म्ह० मंत्री, सरनौबत म्ह० सेनापती, दबीर म्ह० सुमंत, न्यायाधीश व पंडितराव ही होत. या अष्टप्रधानांच्या भिन्न पदांवर ज्यांच्या नेमणुका शिवाजी महाराजांनी राज्याभिषेकाच्या वेळी केल्या त्यांची यादी सभासदाच्या बखरीत दिली आहे ती अशी: १) मोरो त्रिंबक पेशवे – मुख्यप्रधान, २) नारो नीळकंठ व रामचंद्र नीळकंठ – अमात्य, ३) रघुनाथ – पंडितराव व त्यांचे पुत्र – दानाध्यक्ष, ४) हंबीरराव मोहिते – सेनापती, ५) दत्ताजी त्रिंबक – मंत्री, ६) त्रिंबकजी सोनदेव याचे पुत्र रामचंद्रपंत –सुमंत, (७) अण्णाजीपंत– सचिव व (८) निराजी रावजी– न्यायाधीश. राज्याभिषेक शके १५९६ ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशी ( इ. स. १६७४ जून ६ ) रोजी झाला. त्याच सुमारास लिहिलेला एक कनुजाबता इतिहास आणि ऐतिहासिक मासिकाच्या प्रथमवर्षाच्या पहिल्या अंकात प्रसिद्ध झाला आहे. या जाबत्यामध्ये मुख्य प्रधान, अमात्य, सेनापती, पंडितराव, न्यायाधीश, सचिव, मंत्री व चिटणीस या अष्टप्रधानांची कर्तव्ये व अधिकार वर्णिले आहेत व “अष्टप्रधान” ही शब्दावलीही त्यामध्ये आली आहे. प्रधान, अमात्य, मंत्री व सचिव हे शब्द मूळ संस्कृतमध्ये ज्याअर्थी रूढ आहेत, त्या अर्थांनी या अष्टप्रधानसंदर्भात वापरलेले नसून मूळच्या रूढ पर्शियन शब्दांचे पर्याय म्हणून वापरले असून पर्शियन शब्द ज्या हुद्यांचे वाचक आहेत, त्याच हुद्यांचे वाचक बनविले.

ही अष्टप्रधान मंडळाची कल्पना शिवाजी महाराजांना कोठून मिळाली यासंबंधी अनेक संशोधकांनी चर्चा केली आहे. “शिवाजी महाराजांच्या राज्यपद्धतीचा उगम” ( भारत इतिहास संशोधक मंडळ, त्रैमासिक वर्ष ४ अंक १, २, ३, ४. ) या लेखात कै. प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर यांनी या अष्टप्रधान मंडळाच्या कल्पनेचा उगम शुक्रनीतिसार नामक संस्कृत ग्रंथात दाखविला आहे. या संस्कृत ग्रंथात स्वमताने दहा मंत्री असावेत असे सांगून आठ मंत्री असावे असे अन्यमत सांगितले आहे. श्री. शेजवलकर म्हणतात:– “शिवाजीच्या सल्लागार पंडितांचा राजनीतिशास्त्रावरील ग्रंथांपैकी एका शुक्रनीतिसाराशीच परिचय होता असे दिसते. कारण दहा प्रधानांची एक यादी दुसऱ्या जागी एका ठिकाणी कोठेही सापडत नाही. दहांच्या जागी आठांचा पर्यायही तेथेच

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सुचविला आहे. " श्री. शेजवलकर यांनी शुक्रनीतिसार हा ग्रंथ शिवाजी महाराजांच्या काळी प्रचलीत होता, असे गृहीत धरलेले दिसते. वस्तुतः शुक्र-नीतिसार हा ग्रंथ अठराव्या शतकापूर्वी कोणास माहीत होता असे दिसत नाही. संस्कृतमध्ये राजनीतिशास्त्रावरील सुमारे ५० ग्रंथ उपलब्ध आहेत; त्यांत मनु, याज्ञवल्क्य इत्यादी स्मृतींवरील टीका व स्वतंत्र धर्मनिबंध आहेत. त्यांच्या-मध्ये महाभारत, रामायण, मन्वादिस्मृती, कामंदकीय नीतिसार इत्यादी ग्रंथांतील उद्धरणे दिलेली असतात. परंतु शुक्रनीतिसारातील उद्धरण कोठेही दिलेले सापडत नाही. शुक्रनीतिसारातील काही पदे पंडित, सुमंत्र, सचिव, मन्त्री ही व अष्टप्रधानातील पदे सारखी असली तरी अष्टप्रधान या संज्ञेत प्रधान हा शब्द ज्याअर्थी वापरलेला आहे त्याअर्थी शुक्रनीतिसारात वापरलेला नाही. शुक्रनीतिसारात अष्टप्रधान शब्द नसून 'अष्टप्रकृति' शब्द आहे व त्या आठांपैकी प्रधान हा एक होय; परंतु शिवाजी महाराजांच्या प्रधान या शब्दाचा अर्थ आणि हल्लीचा मंत्री ( किंवा सचिव ) या शब्दाचा अर्थ एकच होय; तो शुक्रनीतिसारात नाही. अष्टप्रधान ही संज्ञाच शिवशाहीच्या संदर्भाशिवाय इतरत्र कोठेही भारतीय संस्कृत-प्राकृत साहित्यात सापडत नाही. सचिव (सुरनीस), अमात्य ( मुजुमदार ) व मंत्री ( वाकनीस ) ही अष्टप्रधानातील पर्शिअन शब्दांनी दर्शित केलेली भिन्नभिन्न पदे होत. परंतु संस्कृतमधील राज्य-शास्त्राच्या संदर्भात सचिव, अमात्य व मंत्री हे एकमेकांचे पर्याय शब्द आहेत ( कौटिलीय अर्थशास्त्र व अमरकोश ). शुक्रनीतिसारात मात्र ते भिन्न अर्थी वापरले आहेत. अष्टप्रधान म्हणजे आठ अमात्य, मंत्री किंवा सचिव असा संस्कृत राजनीतीशास्त्राप्रमाणे अर्थ होतो. मात्र ज्या अमात्यांशी राजा सल्लामसलत करतो ते अमात्य मन्त्री. ही गोष्ट येथे लक्षात ठेविली पाहिजे की, शुक्रनीतिसार ग्रंथाने परंपरागत संस्कृत रूढी मोडली; नवे अर्थ शब्दांना दिले. यावरून हे सूचित होते की, शिवाजी महाराजांच्या पश्चात् शुक्रनीतिसार बनले.

आठ मंत्री, अमात्य किंवा सचिव म्हणजे अष्टप्रधान नेमण्याच्या कल्पनेचे मूळ रामायण व महाभारत यामध्ये सापडते. दशरथाचे आठ अमात्य होते असे रामायणाच्या[1] बालकाण्डात ( अ. ७ श्लोक १ व २ बडोदा आवृत्ती ) म्हटले

---

१ अष्टौ बभूवुर्वीरस्य तस्यामात्या यशस्विनः ।।
शुचयश्चानुरक्ताश्च राजकृत्येषु नित्यशः ।। १ ।।
धृष्टिर्जयन्तो विजयः सिद्धार्थो अर्थसाधकः ।।
अशोको मन्त्रपालश्च सुमन्त्रश्चाष्टमोऽभवत् ।। २ ।।

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आहे. त्यात सुमंत्र हा आठवा सांगितला आहे. सुमंत्र हे तेथे एका व्यक्तीचे नाव म्हणजे विशेषनाम आहे. सभासदांच्या बखरीप्रमाणे सुमंत ( सुमंत्र नव्हे ) हा अष्टप्रधानांपैकी एक हुद्दा आहे. त्याचे रामायणातील सुमंत्र या दशरथाच्या मुख्य अमात्याशी थोडे शाब्दिक साम्य दिसते.

महाभारताच्या शांतिपर्वातही[२] (अ. ८६।१०) राजाने आठ मंत्र्यांमध्ये बसून मंत्रणा म्हणजे सल्लामसलत करावी असे म्हटले आहे. मनुस्मृतीतही (७।५४) सात किंवा आठ मंत्री करावेत असे म्हटले आहे. कौटिलीय अर्थ-शास्त्रात मंत्रिपरिषद ही बारा अमात्यांची असावी असे मानवांचे मत, सोळांची असावी बार्हस्पत्यांचे मत, वीसांची असावी असे औशनसांचे मत सांगून यथाशक्ती संख्या असावी असे कौटिल्याचे मत सांगितले आहे. कामंदकीय नीतिसारात मंत्रिसंख्या ५ किंवा ७ अशीही सांगितली आहे. म्हणजे मंत्र्यांची संख्या किती असावी यासंबंधी आवश्यकतेनुसार निर्णय करावा असे कौटिल्यादिकांचे मत दिसते.

शुक्रनीतिसार हा ग्रंथ मराठेशाहीतील प्रधानमंडळात प्रतिनिधी हा निराळा हुद्दा तयार झाल्यानंतर झाला असावा. शिवाजी महाराजांच्या अष्टप्रधानांमध्ये प्रतिनिधी हा निराळा हुद्दा नाही. आज्ञापत्रात तर प्रधान म्हणजेच प्रतिनिधी असा सामान्य अर्थ दिला आहे. शिवाजी महाराजांच्या अष्टप्रधानांच्या संज्ञांमध्ये प्राड्विवाक ही संज्ञा नसून त्याऐवजी न्यायाधीश ही संज्ञा आहे. शुक्रनीतिसारात न्यायाधीशास प्राड्विवाक असे म्हटले आहे. शुक्रनीतिसारामध्ये[३] स्वतःच्या मताने राजाचे दहा मंत्री असावेत असे सांगून त्यात पुरोधा म्हणजे पुरोहित हा सर्वश्रेष्ठ मंत्री होय असे म्हटले (अ. २) आहे. परंतु उलट शिवाजी महाराजांच्या अष्टप्रधान मंडळात पुरोहिताला

२. अष्टानां मन्त्रिणां मध्ये मन्त्रं राजोपधारयेत् ॥

३. पुरोधाश्च प्रतिनिधिः प्रधानः सचिवस्तथा ॥ ६९ ॥
मन्त्री च प्राड्विवाकश्च पण्डितश्च सुमन्त्रकः ॥
अमात्यो दूत इत्येता राज्ञः प्रकृतयो दश ॥ ७० ॥......
अष्टप्रकृतिभिर्युक्तो नृपः कैश्चित्स्मृतः सदा ॥ ७१ ॥
सुमन्त्रः पण्डितो मन्त्री प्रधानः सचिवस्तथा ॥
अमात्यः प्राड्विवाकश्च तथा प्रतिनिधिः स्मृतः ॥ ७२ ॥......
पुरोधाः प्रथमं श्रेष्ठः सर्वेभ्यो राजराष्ट्रभृत् ।

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अखेरचे स्थान दिले आहे. आणि मुख्य प्रधान म्हणजे पेशवा हा सर्वश्रेष्ठ सांगितला आहे. शुक्रनीतिसारात दहा हुद्दे व त्यांची कामे सांगताना मंत्री शब्द दहांपैकी एका हुद्यावरची व्यक्ती अशा विशेष अर्थी सांगून, नंतर पुढे सामान्य अर्थी वापरला आहे. शुक्रनीतिसाराच्या अनुसारे शिवाजी महाराजांची अष्टप्रधानव्यवस्था निघाली असे म्हणण्यापेक्षा अठराव्या शतकात वा राजाराम किंवा शाहू महाराजांच्या राजवटीत शुक्रनीतिसाराची रचना झाली असावी असे अनुमान निघते. प्रधान, अमात्य, सचिव इत्यादी संस्कृत शब्दांना जे नवे अर्थ आले ते पर्शियन शब्दांना संस्कृत पर्याय शोधण्याच्या शिवकालीन प्रयत्नामुळे आले. उदाहरणार्थ, रघुनाथ पंडिताचा राजव्यवहारकोश. कोणीतरी संस्कृत पंडिताने मराठेशाहीपर्यंतचे संस्कृतमधील राजनीतिशास्त्रावरील ग्रंथ अभ्यासून मराठेशाहीशी काही अंशी जुळता असा हा शुक्रसारग्रंथ तयार केला असावा. महाभारत, मनुस्मृती, याज्ञवल्क्यस्मृती, नारदस्मृती, बृहस्पतिस्मृती, कात्यायनस्मृती यांतून व त्यानंतरच्या संस्कृत ग्रंथांतून श्लोक निवडून हा ग्रंथ रचला आहे. म्हणून हा ग्रंथ शिवराजनीतीचा आधारभूत ग्रंथ म्हणून म्हणता येत नाही.

शुक्रनीतिसारात सर्व दहा मंत्री ब्राह्मणच असावे असे म्हटले आहे; ही गोष्ट महाभारत, मन्वादिस्मृतिग्रंथ व कौटिल्याचे अर्थशास्त्र यांच्याशी सुसंगत नाही. महाभारतात[४] ( शांतिपर्व अ. ८५ ) चार ब्राह्मण, आठ क्षत्रिय, एकवीस वैश्य, तीन शूद्र व एक सूत असे अमात्य नेमावे; आणि या सदतीसांपैकी आठ निवडून त्यांच्याशी मंत्रणा करावी म्हणजे त्या आठांना मंत्री बनवावे असे म्हटले आहे. कौटिलीय अर्थशास्त्रात मंत्री कोणास करावे यासंबंधी वर्ण किंवा जात न सांगता केवळ गुणदोष सांगून गुणांच्या अनुरोधाने राजाने मंत्री नेमावे असे म्हटले आहे. मनुस्मृतीमध्येसुद्धा अमात्यांची नियुक्ती करीत असताना वर्णजातिविवेक न सांगता गुणानुसारीच अमात्यनियुक्ती सांगितली आहे. हीच गोष्ट याज्ञवल्क्यस्मृतीलाही लागू आहे. श्री. शेजवलकर म्हणतात की शिवाजी महाराजांनी अष्टप्रधानांच्यामध्ये सेनापती पद अब्राह्मणास दिले

४. वक्ष्यामि तु यथाऽमात्यान्यादृशांश्च करिष्यसि ।
चतुरो ब्राह्मणान्वैद्यान्प्रगल्भान्सात्त्विकाञ्शुचीन् ॥
क्षत्रियांश्च तथा चाष्टौ बलिनः शस्त्रपाणिनः ।
वैश्यान्वित्तेन संपन्नानेकविंशतिसंख्यया ॥
त्रींश्च शूद्रान् विनीतांश्च शुचीन् कर्मणि पूर्वके ।
अष्टाभिश्च गुणैर्युक्तं सूतं पौराणिकं चरेत् ॥



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

यावरून ते या मुद्यापुरते समाजसुधारक होते असे सिद्ध होते. शेजवलकरांचे हे म्हणणे श्रुतिस्मृतिपुराणपरंपरेला धरून नाही; कारण सेनापतीपदास मुख्यतः क्षत्रियच पात्र होय ही गोष्ट या परंपरेप्रमाणे मानावी लागते.

शिवाजी महाराजांचे राज्य ही लष्करशाही होती असे कित्येकांचे मत बनण्याचा संभव आहे. कारण, अष्टप्रधानांची कर्तव्ये ज्या जाबत्यामध्ये वर्णिली आहेत, त्यात मुख्य प्रधान, सचिव, अमात्य, मंत्री, सुमंत्र, सेनापती या सहा अमात्यांच्या कर्तव्यांमध्ये सेना घेऊन युद्धप्रसंग करून नवीन प्रदेश मिळविणे व त्याचे प्रशासन करणे हेही एक कर्तव्य सांगितले आहे. परंतु यावरून शिवाजी महाराजांची राज्यपद्धती ही लष्करशाही होती असे अनुमान निश्चितपणे निघू शकत नाही. अष्टप्रधानांपैकी सहाही प्रधानांवर युद्धकर्तव्याची जबाबदारी टाकली याचे कारण शिवाजी महाराजांनी वयाच्या तेराव्या वर्षा-पासून तो राज्याभिषेकापर्यंत किंबहुना जवळ जवळ सर्व कारकीर्द युद्धप्रसंगात किंवा युद्धाच्या पवित्र्यातच ठाण मांडून घालविली. हे अपरिहार्य होते. पोर्तुगीज, सिद्दी, दक्षिणी पातशाह्या व उत्तरेतील मुघली बादशाही यांच्या आक्रमणाच्या धोक्यातच किंवा शत्रूंच्या सतत वेढ्यातच मराठेशाहीचे बीजारोपण झाले व ती वाढीस लागली; त्यामुळे जवळजवळ सर्व मंत्रिमंडळाला योद्ध्यांचे मंडळ बनविणे अनिवार्य होते.

संभाजी– चरित्रकार श्री. बेंद्रे यांचा शिवाजी महाराजांच्या अष्टप्रधान मंडळावर आक्षेप असा आहे की त्यांनी एक अपवाद सोडल्यास सगळे ब्राह्मणच त्यात भरले. या आक्षेपाचे समाधानकारक उत्तर मिळू शकते. ते असे की शिवाजी महाराजांना मुसलमानी बादशाहयांशी संग्राम चालू असताना मुख्यत: अंतस्थविरोध बहुसंख्य मराठे सरदारांकडून झाला. मराठे सरदारांना पिढ्यान-पिढ्या तलवारीने सत्ता संपादून स्वतःच सत्ताधीश बनण्याची महत्त्वाकांक्षा होती. ही महत्त्वाकांक्षा ते प्रामुख्याने मुसलमान पातशाहीचे मांडलिकत्व किंवा सरदारकी संपादून सफल करीत होते. उलट तत्कालीन ब्राह्मणांच्यामध्ये आपल्या सत्तेचा तसा सवतासुभा स्थापन करण्याची महत्त्वाकांक्षा केव्हाही दृग्गोचर झाली नाही. त्यामुळे युद्धप्रसंगाची जबाबदारी ब्राह्मणांवर टाकणे हे शिवाजी-महाराजांना अधिक सुरक्षित वाटले. या ब्राह्मणी प्रवृत्तीला अपवाद शाहु-महाराजांच्या कारकीर्दीत उत्पन्न झाला व त्यातूनच पेशवाई निर्माण झाली. हा महत्त्वाचा ऐतिहासिक संदर्भ ध्यानात घेतल्याशिवाय शिवाजी महाराजांच्या अष्टप्रधान नेमणुकीचा अर्थ कळणार नाही.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. हरिहर चंद्रशेखर थोंगे

# ज्ञानदेवांच्या चरित्रातील चमत्कार

## ( पूर्वार्ध )

## ( ज्ञानदेवांचा योग )

ज्ञानदेवांचे चरित्र त्यांच्या जीवनात चमत्काराची आभा भरून असल्यामुळे अलौकिक झाले आहे. पण ज्ञानदेवांनी ज्ञानदेवीतून अथवा अभंगांतून योग्यांच्या अनुभूतीचे जे वर्णन दिलेले आहे किंवा निरंजनपदाच्या प्राप्तीसाठी जे पंथ सांगितले आहेत त्या पंथातून जे अध्यात्मिक अनुभव लाभतात त्यांत सिद्धी आणि चमत्कारांना कोणत्या अर्थाने जागा आहेत ते तपासून बघता ज्ञानदेवांना करुणेचे आणि भावभक्तीचे मार्ग अभिप्रेत असून ईश्वरी मीलनासाठी ते तळमळतात अशी साक्ष त्यांच्या अभंगातून मिळते. योगमार्गाचे अथवा सिद्धींचे आकर्षण त्यांना नसावे. आणि निरनिराळ्या यौगिक सिद्धी त्यांना प्राप्त झालेल्या नसाव्यात असे वाटते. असे असता सिद्धींच्या विश्वातही अशक्य असणारे कांही चमत्कार ज्ञानदेवांच्या जीवनाला का जोडले गेले त्याचा शोध घेणे योग्य होईल. पण असा शोध घेण्याची श्रद्धावानांना गरज नसते. आणि ज्यांनी ह्या चमत्कारांचा शोध घेतला त्यांनी प्रमाणाअभावी नुसती अनुमानेच बांधली आहेत. उदा० 'ज्ञानदेवांनी रेड्याच्या मुखातून वेद वदविला' ह्या चमत्काराचा अर्थ सांगताना रेडे नावाच्या निर्बुद्ध ब्राह्मणाच्या मुखातून ज्ञानदेवांनी वेद वदविले अशी मीमांसा कांही विचारवंतांनी मांडलेली होती. पण अशा अनुमानासाठी प्रमाणे मात्र दिलेली नाहीत.

संतचरित्रात अथवा पोथ्यांमध्ये चमत्कार असतात. श्रद्धावानांना लाभ आणि अश्रद्धांना हानी असा प्रत्येक पोथीचा दावा असतोच. या लाभाच्या हेतूनेच आणि अश्रद्धेच्या पोटी प्राप्त होणाऱ्या शिक्षेच्या भयगंडातून पोथीची पारायणे होत असतात. अर्थात श्रद्धावानाना लाभ आणि अश्रद्धाना शासन अशी पक्षपाती मनोवृत्ती संतप्रवृत्तीशी पूर्णांशानेच विसंगत असते. पण पोथीत वा चरित्रात लाभालाभाचा जो भाग असतो तो चरित्रकाराच्या अथवा पोथीकाराच्या वृत्तीचा उन्मेष असतो. संतचरित्रकार अथवा पोथीकार प्रामुख्याने कीर्तनकार, पुराणिक, प्रवचनकार

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असतो. संतचरित्रकाराची लोकेषणा आणि अर्थेच्छा सदैव जागृत असते. सर्वसामान्य जनतेची श्रद्धा, अंधश्रद्धा कायम ठेवण्यातच त्यांचा योगक्षेम नीट चालत असतो. म्हणूनच लौकिक घटनांना दिव्यत्व प्रदान करून लोकरंजन व लोकशिक्षण या माध्यमातून मध्ययुगीन कथाकारांनी, पौराणिकांनी, कीर्तनकारांनी, सर्वसामान्य जनतेची स्वयंप्रज्ञा मारून टाकलेली असते.

दिव्यकथांमागे कांही अलौकिक घटना असतात. निसर्गातील कांही चमत्कारांना अथवा इतिहासातील कांही महत्वाच्या घटनांना दिव्यकथांचे स्वरूप प्राप्त झालेले असते. कारण या घटनामागचा अर्थ अनाकलनीय तरी असतो. अथवा विस्मृतीच्या कक्षेत गेलेला असतो. पण या दिव्य कथांतून इतिहासाचे तुटक धागे सापडणे शक्य असते. जसे महाभारतातील हत्ती आणि कासव यांच्या युद्धाच्या वर्णनावरून इतिहासात केव्हातरी झालेल्या हिटाईट आणि कॅसाइट या दोन टोळयातील संघर्षाची स्मृती महाभारतकाराने ठेवलेली आहे असे म्हणता येते. सगराचे साठ हजार पुत्र कपिलाच्या शापाने मृत्युमुखी पडले यांत देखील बंगाल बिहारकडे ज्वालामुखीच्या उद्रेकांत वा भूकंपात नष्ट झालेल्या सगरपुत्रांच्या संस्कृतीचा इतिहास दिव्यकथेच्या स्वरूपात बद्ध असावा असे वाटते ' कुशीलवांनी ' रामकथा गाईली या घटनेतून पुढे कुश आणि लव या रामपुत्रांनी रामायण गाईले अशा तऱ्हेची कथा रचण्यात आली.[१] आणि रामायणाच्या उत्तरकांडांत सीतेला पुत्रवती करण्यात आले. पण यात सीतेच्या चारित्र्यावर अप्रत्यक्ष आरोप येतो याचा विचार भाविकांना कधीच स्फुरणारा नसतो. सीतेच्या चारित्र्यावर या घटनेमुळे जे आक्षेप घेतले गेले आहेत त्या संबंधीची अवतरणे प्रो. नावलेकरानी ' न्यू अप्रोच टु रामायण ' या ग्रंथात उद्धृत केली आहेत. नावलेकर या विचारांशी सहमत नाहीत[२]. पार्श्वनाथाने तपस्या केली त्यावेळी क्रुद्ध होऊन इंद्राने जो हैदोस घातला त्यापासून नागांनी पार्श्वनाथाचे संरक्षण केले अशी कथा जैन वाङमयातून प्रसिद्ध आहे. या कथेत देखील पार्श्वनाथ या जैन तीर्थंकराला याज्ञिकांच्या विरोधापासून सुरक्षितता म्हणून नागराज्याचा आश्रय घ्यावा लागला असा इतिहास लक्षात येतो. भीमेच्या वाळवंटात पांडुरंग आणि पुंडलिक मुनी यांची देवळे समोरासमोर बघून पुंडलिकाच्या मातृपितृभक्तीची आणि कृष्णाच्या विटेवर थांबण्याची कथा भावि-

१. संस्कृती:—डॉ. इरावती कर्वे. पान. १३.

२. न्यू अप्रोच टु रामायण— प्रो. नावलेकर. पान. २ तळटीप. आणि पान ५३.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कानी रचली. ज्ञानदेवाना ही कथा ज्ञात नाही हे लक्षात घ्यावे लागते. तात्पर्य दिव्यकथात इतिहास दडलेला असतो अथवा काही घटनांना अजरत्व देण्यासाठीही दिव्यकथा बांधल्या जातात. नामदेवांचा जन्म शिंपी यांच्या ज्ञातीत झाला त्यावरून त्यांचा जन्म शिंपल्यातून झाला अशी कथा नामदेवांच्या चरित्रकारानी रूढ केली. देहाला अजरामर करण्याची प्रक्रिया ज्ञात असल्यामुळे 'गोरक्ष' हे नाव प्राप्त झाले असावे हे लक्षात न घेता गोरखनाथांचा जन्म राखेतून झाला अशीही कथा जन्माला आली. ज्ञानदेवांच्या जीवनात जे चमत्कार घडून आले त्यामागे असणाऱ्या अर्थाची विस्मृती झाली असण्याची शक्यता आहे.

## ज्ञानदेवांचे चरित्र

ज्ञानदेवांचे लौकिक चरित्र उपलब्ध नाही. त्यांचे चरित्र ठरविण्याची साधनेही उपलब्ध नाहीत. तशी विश्वसनीय साधने उपलब्ध नसल्यामुळे कै. डॉ. मा. गो. देशमुखांनी ज्ञानदेवाना वाङमयीन व्यक्तिमत्त्व ठरविले होते. ज्ञानदेवांची जी चरित्रे उपलब्ध आहेत ती मध्ययुगीन संतांनी रचलेली असल्यामुळे भावुक व चमत्कृतींनी भरलेली झालीत ही त्या काळाची गरज होती. पण ज्ञानदेवांची चरित्रे देखील त्यांच्यानंतर चार पाच शतकानी बांधली गेली आहेत. कारण ज्ञानदेवाना निकट असणाऱ्या काळखंडातील नामदेव, नामदेवांचा परिवार, जनाबाई, चोखोबा, कान्होपात्रा, गोरोबा, नरहरी, सेनामहाराज या संतानी किंवा एकनाथांनी देखील ज्ञानदेवांचे चरित्र सांगितलेले नाही. या संतांना ज्ञानदेवांच्या मांसवंशाचाही पत्ता नाही. ज्ञानदेवांनी देखील आपल्या मांसवंशाचा अथवा पूर्वजांचा आपल्या वाङमयातून पुसटसाही उल्लेख केलेला नसून सोपान व मुक्ताचाही निर्देश त्यांच्या वाङमयात नाही. एक दोन अभंगात तसा उल्लेख आहे पण ते अभंग ज्ञानदेवांचे नसावेत असेच त्या अभंगाच्या शैलीवरून वाटते. कोणत्याच संतांनी ज्ञानदेवांचे आणि सोपान मुक्ताचे नातेही स्पष्टपणे सांगितलेले नाही पण ज्याअर्थी संतांच्या स्मरणात ही नावे सजीव आहेत त्याअर्थी ज्ञानदेव, सोपान, मुक्ता या नावाच्या देहधारी व्यक्ती अस्तित्वात होत्या (त्या फार तर परस्परांच्या नाते संबंधात नसतील) हे नाकारण्यात अर्थ नाही. उद्बोधनाथ, सत्यामळनाथ यांनी ज्ञानदेवांचे चरित्र लिहिले आहे. पण या चरित्ररचनेचा काळखंड शके १५५० नंतरच ठेवावा लागतो. ज्ञानदेवांचे अस्पष्ट चरित्र एकनाथांचे आधी उपलब्ध नाही. तसे असते तर एकनाथांनी ते चरित्र सांगितले असते. एकनाथकाळात ज्ञानदेवीची पोथी अस्तित्वात होती ती एकनाथांनी शुद्ध केली. ज्ञानदेवांच्या समाधीचा जीर्णोद्धार केला. अजानवृक्षाखालील वा महादेवाच्या देवळासमोर





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असणारी समाधी उकरून ज्ञानदेवांच्या अस्थी त्यांनी पांडुरंगासमोर भूमिनिक्षेपित करून नवी समाधी बांधली असावी असे दिसते. या घटनेपासून नाथभागवत पंथातील आद्य प्राकृत ग्रंथ या संदर्भात ज्ञानदेवीचे महत्व वाढले. जवळ जवळ तीन चार शतके ब्राह्मण समाजाने वाळीत टाकलेल्या या ग्रंथाची पारायणे प्रारंभित झाली. ज्ञानदेवपंथ जागृत करून तो ब्राह्मण समाजात लोकप्रिय करण्याचे श्रेय एकनाथांनाच द्यावे लागेल. एकनाथकाळानंतर ज्ञानदेवांच्या चरित्राची गरज भासू लागली आणि एकनाथापूर्वी झालेल्या संतांच्या अभंगांचा शोध घेऊन ज्ञानदेवांच्या अभंगातून, अथवा नामदेव, विसोबा, चोखोबा, सेना-महाराज यांच्या परंपरेतील शिष्यांना जे ज्ञात होते ते वेचून ज्ञानदेवादि भावंडांचे हृदयंगम चरित्र तयार करण्यात आले. ज्ञानदेवांचा प्रथम चरित्रकार उद्बोधनाथ असावा असे वाटते. शके १६०९ हा त्यांच्या समाधीचा काळ नोंदविला आहे.[३] यास सुमारास संत निळोबांनी चांगदेव प्रकरणात ज्ञानदेवांचे संपूर्ण चरित्र दिलेले आहे. नाभाजीनी भक्तमाला निळोबामहाराजांचे काल-खंडानंतर तयार झाली असावी. निळोबाच्या गाथेनंतर उद्धवचिद्घन नावाच्या कवीचे ज्ञानदेवचरित्र ठेवावे लागते. उद्धवचिद्घनांच्या चरित्रावरून महिपतीने भक्तीविजयातील ज्ञानदेवांचे चरित्र रचले असावे असे दिसते.

'तरी उत्तर देशी साचार। नाभाजी विरंची अवतार। तेणे संतचरित्र ग्रंथ थोर। ग्वालेरी भाषेत वर्णिला। आणि मायदेशी उद्धवचिद्घन ॥' असे महीपती स्पष्टच सांगतो. 'ज्ञानदेवांची आदि' हे अभंग प्रकरण उद्धवचिद्घनांच्या ज्ञानदेवचरित्रावरून तयार केलेली अनामिक कवीची रचना आहे. कारण या अभंगाची भाषा महीपतीच्या कालखंडानंतरची आहे. किंवा महीपतीच्या भक्त-विजयातील ओव्यांना अभंगाची जोड द्यावी या हेतूने अलिकडच्या काळातील कीर्तनकाराची ती रचना असावी.

'ज्ञानदेवांची आदि'

नामदेवांच्या अभंगगाथेतील हे प्रकरण नाममुद्रेच्या अभावी नामदेवांचे नाही म्हणून त्याज्य ठरवावे लागते. नामदेवांच्या नावावर कबीर, मीरा, बोधलेबुवा, संताजी पवार इत्यादि संतांची चरित्रे आहेतच पण 'परसा भागवत सावता नरहरी। चोखा मेळा द्वारी भानुदास।[४] असाही उल्लेख आहे. शेवटी तेथे टाळ दिंडी घेऊनिया नामा। भेटी पुरुषोत्तमा आला असे। अशी नामदेवांची

३. गुरु गोरक्षनाथ. रा. चिं. ढेरे – पान १७२.
४. नामदेवगाथा सरकारी प्रत. अभंग १२३०.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नाममुद्राही आहे. पण त्यावरून हा अभंग नामदेव दामाजी या संताचा असावा असे जर म्हटले तर नामदेवांना भानुदासानंतरचे काळात ठेवावे लागते. आणि नामदेवांना भानुदासोत्तर काळात म्हणजे शके १४०० चे दरम्यान ठेवले तर अनायासेच ज्ञानदेव नामदेव काळखंडात दोन शतकांचे अंतर पडते. या काल-खंडात ज्ञानदेवचरित्राची विस्मृती होण्याची शक्यता आहे. पण नामदेवांचा जन्म शके ११९२ चे सुमारास झाला या तिथीसंबंधी विसंगती नसल्यामुळे हा कालखंड गृहीत धरता भानुदासाचा उल्लेख काळविपर्यस्त ठरतो. अर्थातच हे अभंग दुसऱ्या नामदेवाचे असावेत. नामदेव गाथ्यातील नामदेव नाममुद्रेवर असणारे कांही अभंगही जेथे नामदेव दामाजी संतांचे नाहीत तेथे अनामदेवी रचनेला नामदेवांचीच रचना समजण्यात संशोधकांनी कोणते गमक लक्षात घेतले त्याचा बोध कै. पांगारकर, कै. दांडेकर या महाभागांनी दिलेला नाही. आणि ज्ञानदेवचरित्राची बांधणी करण्यासाठी हे अनामदेवी अभंगच प्रमाण मानलेत. अलिकडे प्रा. वावगावकरांनी तीच चूक केलेली आहे. कारण त्यांच्या मते नामदेवांनी लिहिलेल्या ज्ञानदेवचरित्राची उद्धवचिद्घनांना माहिती होती.[५] यावरून नामदेवगाथेतील ‘ ज्ञानदेवांची आदि ’ हे प्रकरण नामदेवांनी रचले असावे असा प्रा० वावगावकरांचाही विश्वास आहे असे दिसते. आणि येथेच संशोधकांची चूक होते.

नामदेवांचा गाथा नीट शोधला तर त्यांत नामदेवांच्या नाममुद्रेवर ज्ञानदेवांची समाधी आणि ज्ञानदेव समाधी महिमा अशी दोन प्रकरणे आहेत. त्यापैकी समाधीचे प्रकरण अभंगवृत्तात बद्ध असून ते अत्यंत रसाळ आणि कारुण्याने ओथंबलेले आहे. आणि नामदेवांच्या प्रतिभेची साक्ष त्यांत उमटली आहे. त्यामुळे ते नामदेवांचे नसावे असे म्हणण्यात अर्थ नाही. समाधीमहिमा हे प्रकरण प्रामुख्याने ओवीबद्ध आहे. त्यात भावुक अशा काव्यप्रतिभेचे कुठेच दर्शन होत नाही. हे प्रकरण मात्र आद्य नामदेवांचे नसून विष्णुदास नामा नावाच्या कवीचे असावे. कारण विष्णुदास नाम्याची कविता ओवीबद्ध असून ती नीरस आहे. आणि संस्कृतशब्दप्रचुर आहे. हे सारे विशेष ज्ञानदेवसमाधि-महिमा या ओवीबद्ध प्रकरणात जाणवतात. या प्रकरणामागे नामदेवदामाजी संताने रचलेले ‘ समाधी प्रकरण ’ संदर्भ म्हणून असावे. महिपतीने विष्णुदास नाम्याच्या समाधीप्रकरणाचा उल्लेख केला आहे. ‘ विष्णुदास नामा प्रेमळ

५. संशोधन व चिंतन–ज्ञानेश्वरांचे एक अज्ञात चरित्र प्रा. वावगावकरांचा लेख.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

भक्त। जो उद्धवाचा साक्षात अवतार। तेणे केला समाधी ग्रंथ। ते पावन चरित्र परिसावे ।। या ओवीतील विष्णुदास नामा मात्र आद्य नामदेव असावा. कारण जनाबाईच्या एका अभंगात ' ऐका हो जन्म नामयाचा मूळसंचित। असे सांगून शेवटी ती सांगते ' द्वापारी कृष्णसेवा उद्धव जन्मला। कुब्ज्या नाम माझे देवे उद्धार केला ।। कलीत नामदेव विठ्ठल चरणी। त्याचीच सेवे लागी दासी जन्मली जनी ।। ४ ।। '[६] उद्धवाचा अवतार नामदेव हा नामदेव दामाजी शेठी नावाचा आद्य नामदेव होय असे ठरते. त्या संदर्भावरून महिपतीला नामदेव विरचित 'ज्ञानदेवांची समाधी' हे रसाळ प्रकरण ज्ञात असावे. एकूण नाभाजीची छप्पायी, उद्धवचिद्घनरचित ज्ञानदेवचरित्र, आणि नामदेव विरचित 'ज्ञानदेवांची समाधी' इत्यादी वाङ्मयीन प्रमाणांच्या आधारे महीपतीने ज्ञानदेवांचे चरित्र सांगितले असे दिसते. पण महीपती ज्याअर्थी नामदेवांच्या 'समाधी प्रकरणाचाच' निर्देश करतो आणि नामदेवविरचित ज्ञानदेवचरित्राचा उल्लेख करीत नाही त्याअर्थी नामदेवांच्या अभंगगाथेत 'ज्ञानदेवांची आदि' हे प्रकरण महीपतीच्या काळापर्यंत अंतर्भूत नसावे 'ज्ञानदेव समाधी' अथवा 'ज्ञानदेवसमाधीमहिमा' या दोन्ही प्रकरणांत ज्ञानदेवाच्या चरित्राचा लवलेशही नाही हे लक्षात घेणे आवश्यक आहे. तात्पर्य एकनाथकाळापूर्वी ज्ञानदेवांचा महिमा संतांना ज्ञात होता. ज्ञानदेव चरित्राविषयी एकही संत अवाक्षराने सांगत नाही. सच्चिदानंदांच्या मानसपूजा नावाच्या ग्रंथात ज्ञानदेवांचे चरित्र असावे किंवा सच्चिदानंद विरचित ज्ञानदेवचरित्र अस्तित्वात असावे असाही कांही संशोधकांचा तर्क आहे पण हा सच्चिदानंद एकनाथोत्तर काळातील संत असावा असेही सिद्ध करता येते.

## सच्चिदानंदविरचित ज्ञानदेवचरित्र

हे चरित्र उपलब्ध नाही. पण 'श्री ज्ञानदेवांचा किंकर। अर्जुनाचा अवतार। सच्चिदानंद योगेश्वर। बहुदयापर होऊनिया ।। १०१ ।। पूर्वपरंपरायुक्त। केला मानसपूजा ग्रंथ। त्यातील विष्णुरहस्य तत्व। अतिगुप्त जे ।।१०२।।' अशी एक ओवी डॉ. रा. ग. हर्षे ह्यांनी उद्धृत केली आहे.[७]

या ओवीवरून 'मानसपूजा' नावाचा एक ग्रंथ सच्चिदानंदानी रचला असावा असे स्पष्ट होते. पण 'मानसपूजा' हा तत्वज्ञानपर ग्रंथ असावा त्यांत

६. नामदेवगाथा- सरकारी प्रत. जनाबाईचे अभंग. क्र. ४३१.

७. ज्ञानदेवी. संपादन. डॉ. रा. ग. हर्षे, पान ३३

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ज्ञानदेव चरित्र नसून नाथपंथी तत्वज्ञान असावे. सच्चिदानंदांच्या कालखंडाचा शोध सिद्धप्रतीच्या कालखंडावर प्रकाश टाकण्यास महत्वाचा ठरेल.

एकनाथोत्तर काळातील चांगदेवमठातून प्राप्त झालेल्या ज्ञानदेवीच्या प्रतीत ' आदिनाथं गुरुं वन्दे दत्तात्रय जनार्दन । जंगनाथं चिदानंदं स्वास्वानंदवर्धन ॥' अशी एक गुरु-शिष्य परंपरा उपलब्ध होते. याच प्रतीत पुढे —

आदिगुरुं दत्तात्रय जनार्दन एकनाथचितानंद स्वानंद गोविंदमुर्ती[८] । आनादि परम गुरवे नमः असाही उल्लेख आहे. त्यावरून सच्चिदानंद नावाचा एक सत्पुरुष एकनाथानंतरचे कालखंडात होऊन गेला असे स्पष्ट होते. चिदानंद एकनाथांचा शिष्य होता असे दिसते. सच्चिदानंद ( चिदानंद ) गोविंदमुनीचा परमगुरु होता. हे सच्चिदानंद ज्या ज्ञानदेवांचे शिष्य होते त्या ज्ञानदेवांचाही शोध घेणे आवश्यक आहे.

राजवाडे संशोधनप्रतीत ' भावार्थदीपिका धृवा ज्ञानदेवविनिर्मितां । इति गोविंदवाक्यं ' असा उल्लेख असून याच प्रतीत पुढे —

' शके सोळाशे तेरोत्तरे । तै पद्धती केली ज्ञानेश्वरे । गोविंद बरवामुखांतरे । जगज्जीवन लेखक । ' अशी महत्त्वाची माहिती दिलेली आहे. त्यावरून एकनाथकाळी ज्ञानेश्वर नावाचा दुसरा एक कवी अस्तित्वात होता व त्याने ज्ञानदेवीवर जी टीका केली ती गोविंदाने वाचून दाखविली आणि जगज्जीवन ह्याने लिहून घेतली असा शोध लागतो.

एकनाथकाळात ज्ञानेश्वर नावाचे संत असावेत असे अनुमान एकनाथांच्या एका अभंगावरून काढता येते. कारण ' झाले ज्ञानदेव वाणी । आले सामुग्री घेऊनीया ' अशा अर्थाचा एक अभंग एकनाथांनी दिलेला आहे. एकनाथाचे आधी चार शतके जीवनयात्रा संपविलेल्या ज्ञानदेवांनी पुन्हा वाण्याच्या रूपात दुकान थाटावे हे योग्य वाटत नाही. लौकिक जगात ते शक्यही वाटत नाही. त्याअर्थी एकनाथकालात ज्ञानेश्वर नावाचे दुसरे एक वाणीजातीचे संत अस्तित्वात असावेत असे स्पष्ट होते. या ज्ञानेश्वरांचे सच्चिदानंद शिष्य असून त्यांच्या शिष्यपरंपरेत गोविंदस्वामीचे नाव अंतर्भूत करावे लागते.

ज्ञानेश्वर वाणी संतांच्या अभंग रचना ज्ञानदेवांच्या अभंगगाथेत अंतर्भूत असून त्या भाषिक पुराव्याच्या आधारे आणि अभंगांतर्गत तत्वज्ञानाच्या विचारांवरून वेगळ्या काढता येणे शक्य आहे. ज्ञानेश्वर या नाममुद्रेवर असणारे

---

८. ज्ञानदेवी. रा. ग. हर्षे-चांगदेवमठातील पोथी.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

गणपतीच्या स्तवनाचे अभंग, आणि आत्मज्ञानपर कांही अभंग ज्ञानदेवांच्या रचनेच्या तुलनेत भिन्न वाटतात. त्यांची भाषादेखील एकनाथी वळणाची वाटते.

ज्ञानेशशिष्य प्रसिद्ध । महायोगी सच्चिदानंद । त्याचा शिष्य सिद्धानंद । सिध्या प्रसिद्ध ज्यापुढे ।।. या भक्तितत्वामृतातील ओवीवरून ज्ञानदेवीची सिद्ध प्रत ज्या सिद्धानंदाची होती तो सच्चिदानंदाचा शिष्य असून हा सच्चिदानंद एकनाथकालीन ज्ञानदेवांचा शिष्य होता. अर्थातच सिद्धप्रत ही एकनाथोत्तर-कालीन असावी असा शोध लागतो. सिद्धप्रतीचा काळ डॉ. रा. ग. हर्षे ठरवितात त्याप्रमाणे शके १२७२ नसून. शके १५७२ असावा. आणि ज्ञानदेवाचा शिष्य सच्चिदानंद देखील एकनाथोत्तर काळातच झाला असावा—असे म्हणता येते. तात्पर्य ज्ञानदेवांचे एकनाथांपूर्वी एखादे चरित्र अस्तित्वात असावे असे म्हण-ण्यास कोणताच आधार नाही, त्यामुळे त्या चरित्रात एकनाथोत्तरकालीन हरदासांनी चमत्कार भरून अलौकित्वाच्या स्वरूपात सादर केले.

ज्ञानदेवचरित्रातील चमत्कार

म्हैशाच्या मुखातून वेदपठण, भिंतीचे चलन, पाठीवर मांडे भाजणे, स्वर्गस्थ पितराना आमंत्रित करणे, सच्चिदानंदाना मृत्यूनंतर जिवंत करणे हे ज्ञानदेवाच्या चरित्रातील प्रमुख चमत्कार होत. पण एकनाथापर्यंत ज्ञानदेवांचे दोनच चमत्कार संतांना ज्ञात आहेत. सेनामहाराजांचा अभंग मात्र अपवाद म्हणून वगळावा लागतो. नामदेव म्हणतात ‘ बोलविला वेद म्हैशीपुत्रा ।। ’ ज्ञानदेवांची समाधी या प्रकरणात नामदेवानी दोन चमत्कार सांगितले आहेत.

‘ वेद म्हैशामुखी बोलविले । चालविली भिंती मृत्तिकेची ।। ’ जनाबाईने ज्ञानदेवांचे महात्म्य सांगितले आहे. पण चमत्कार सांगितले नाहीत. रेडियांचे मुखे वदविली वेद श्रुती । चौदाशे वरुषांचे तप्तीतीर रहिवाशी : गर्व हरविला चालविले भिंतीशी । असे दोन चमत्कार कान्होपात्रेनेही सांगितलेले आहेत. कान्होपात्राच्या काळात म्हैशाचा रेडा झाला. चोखोबांना ज्ञानदेवांविषयी फारसे ज्ञात नाही. ‘ त्यांनी ज्ञानेश्वरी ग्रंथ रचला एवढेच ज्ञात आहे. ’ तो हा महाराज ज्ञानेश्वर । जेणे निगमवल्ली प्रगट केली । चोखा म्हणे श्रेष्ठ ज्ञानदेवी ग्रंथ । वाचिता सनाथ जीव होती ।। पण चोखोबांना ज्ञानदेवांचे ज्ञान नामदेवांच्या अभंगातून झाले असावे असे दिसते. कारण ‘ ज्ञानराज माझी योग्यांची माउली । जेणे निगमवल्ली प्रगट केली ।। नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी । एक तरी ओवी अनुभवावी ।। ’ अशा अभंगासारखी चोखोबाची ग्वाही आहे. नामदेवा-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नंतर झालेल्या संतांना ज्ञानदेवासंबंधी जी माहिती आहे तिचा आधार नामदेव-गाथेतील व नामामुद्रांकित केवळ पाच अभंगातच शोधावा लागतो. समाधीचे अभंगात नामदेव म्हणतात: 'शिव तो निवृत्ति । सोपान ब्रह्ममूर्ती । ज्ञानदेव मूर्ती । विष्णूची हो । ब्रह्मणि हे कळा । माय मुक्ताबाई । विचारुनी पाही । स्वयं मुक्ता ।' आणि कान्होपात्राही तसेच सांगते. 'शिव तो निवृत्ति । विष्णु ज्ञानदेव पाही । सोपान तो ब्रह्मा । माय मुक्ताबाई ।.' नरहरी सोनाराला ज्ञानदेवादि भावंडांच्या नावापरते दुसरे काही महत्त्वाचे ज्ञात असावेसे वाटत नाही. सेनामहाराजांनी ज्ञानदेवादि भावंडांच्या समाधीस्थळांचे माहात्म्य तेवढे वर्णन केलेले आहे. त्या वर्णनालाही नामदेवविरचित ज्ञानदेवादिभावंडांच्या समाधी प्रकरणाचाच आधार असावा. 'ज्ञानदेव आळंकापुरास जन्माला आलेत व त्याच्या द्वारी सोन्याचा पिंपळ आहे. एवढीच महत्त्वाची माहिती सेनामहाराज देतात.

सेना महाराजांच्या नाममुद्रेवर एकच अभंग आहे.' वाळिता ब्राह्मणी स्वर्गीचे पितर आणविले। सेना म्हणे जगी पूर्ण ब्रह्म अवतरले ॥.' सेनामहाराजांच्या अभंगात कान्होपात्राच्या सारखीच अभिव्यक्ती आहे. कान्होपात्रा म्हणते. 'शिव तो निवृत्ति । विष्णु ज्ञानदेव पाही । सोपान तो ब्रह्मा । मूळ माया मुक्ताबाई । चौदाशे वरुषांचे तप्तीतीर रहिवाशी । गर्व हारविला चालविले भिंतीशी ।' सेना महाराजांच्या अभंगातही असेच वर्णन आहे 'शिव तो निवृत्ती । आदिमाया मुक्ताबाई । ब्रह्मा तो सोपान । विष्णु ज्ञानदेव पाही ।, तप्तीतीरवासी चौदाशे वर्षांचा होता. 'तयाचा गर्व हरि आदिमाता ।' सेनामहाराजांचा हा अभंग वास्तविक आळंदीमहात्म्यात अंतर्भूत व्हावयास पाहिजे. पण त्या अभंगात सेना-महाराजांनी ज्ञानदेवांचे चमत्कार सांगितले नाहीत याची जाणीव झाल्यानंतर संत निळोबा नंतरचे कालखंडात सेनापरंपरेतील कवीने कान्होपात्राचा अभंग व निळोबाच्या गाथेत वर्णन केलेल्या पितरआमंत्रणाचा चमत्कार असणाऱ्या अभंगाचा आधार घेऊन सेनामहाराजांच्या नावावर रचला आणि संपा-दकाला तो अभंग संदर्भअभावी सेनाच्या अभंगगाथेत एकट ठेवावा लागला. तात्पर्य, स्वर्गाचे ब्राह्मण जेवावयास आमंत्रित केले हा चमत्कार एकनाथाचे काळखंडापर्यंत कोणत्याही संताला ज्ञात नव्हता असे दिसते.

'चालविली जड भिंती । हारली चांग्याची भ्रांती । रेड्यामुखी वेद-बोलविला । गर्व द्विजांचा हरविला ।' हे चमत्कार एकनाथांनी वर्णन केलेले आहेत. नामदेवाच्या काळानंतर म्हैशाचा रेडा झाला हे स्पष्ट दिसते. आणि



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पुढे रेड्याचा पशू झाला. निळोबाच्या गाथेत 'म्हैशा' असाच उल्लेख आहे. 'म्हैशीपुत्र आणि नामे म्हणती ज्याना । तरी काय तो होईल प्रज्ञाशील ॥' असे निळोबा म्हणतात. निळोबानंतरचे काळात उद्धवचिद्घन आणि महीपती हे दोन प्रसिद्ध चरित्रकार झाले त्यांनी ज्ञानदेवांच्या जीवनातील चमत्कार विस्तारून सांगितले.

म्हैशामुखे वेदपठण शक्य आहे काय ? किंवा भिंत चालविणे शक्य आहे काय ? याचा विचार होणे आवश्यक आहे. स्वयंप्रज्ञेची कास धरणाऱ्या संशोधकांनी हे चमत्कार नाकारले आहेत. म्हैशामुखी वेद वदविले याचा अर्थही कांही संशोधकांनी लावलेला आहे. रेडे नावाच्या ब्राह्मणाच्या मुखातून ज्ञानदेवांनी वेद वदविले असा अर्थ संशोधक सांगतात.

## योग आणि सिद्धी

ज्ञानदेवांचे चमत्कार या विषयावरील दोन लेख ज्ञानेश्वरदर्शन अध्यात्मखंड या ग्रंथात प्रसिद्ध झालेले होते. श्री- माहुलीकरांचा 'ज्ञानदेवांचे चमत्कार' हा महत्त्वाचा लेख नसून एकनाथीभागवतातील तेवीस सिद्धींची यादी उद्धृत करण्यापलिकडे माहुलिकरांनी कोणताच महत्त्वाचा मुद्दा मांडला नाही; डॉ. वैद्य ह्यांनी 'श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या अतिमानुषत्वाचे रहस्य' या लेखात चक्रांचे वर्णन करून स्वमतमंडनार्थ कै. रा. द. रानडे ह्यांच्या ग्रंथातील अवतरणे दिली आहेत. डॉ. वैद्यांनी ज्ञानदेवांचे चमत्कार अतींद्रियज्ञानाशी संबंधित केलेले आहेत पण ज्ञानदेवांच्या चरित्रातील एकही चमत्काराचा अतींद्रियज्ञानाशी संबंध नाही हे मात्र डॉ. वैद्यांनी लक्षात घेतले नाही.* ज्ञानेश्वरदर्शनातील लेखांच्या आधाराने प्रा. शं. गो. बाळिबे ह्यांनी ज्ञानदेवचरित्रावर एक पुस्तक लिहिले त्यात महत्वाची माहिती नव्हती. ज्ञानदेवांच्या चरित्रातील चमत्काराविषयी त्यांनी जे भावोद्गार काढले आहेत ते मात्र विचारात घेण्यासारखे आहेत. 'चमत्काराची शक्यता वादातीत आहे.' 'निर्णय देण्यापूर्वी अध्यात्मशास्त्राचा अभ्यास आवश्यक'; शास्त्राभ्यासाच्या अभावी 'वायसी चंद्रु नोलखिजे' अशी स्थिती होते. 'संतांनी केलेल्या चमत्कारांची आणि अनुभविलेल्या गूढ संवेदनांची, साधकाच्या अतीन्द्रिय अनुभवांची वासलात त्या शास्त्राचा विचार न करता, पुढील पिढीतील बावळट. भक्तांची बुद्धिभ्रष्टता, अथवा

* ज्ञानेश्वरीचे लेखन हाच अतींद्रिय ज्ञानाने शक्य असणारा चमत्कार होय.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लफंग्यांची जाहिरातबाजी अशा सारख्या अशिष्ट शब्दांनी लावावी काय ?... ...... चमत्काराची शक्यता वादातीत आहे.'[९]

प्रो. रानडे ह्यानी 'मराठी संतवाङमयातील परमार्थमार्ग' या पुस्तकाच्या आरंभी अतीन्द्रियज्ञानाची चर्चा केली आहे. प्रो. रानडे ह्यांचा लेख प्रा. वाळिंबे ह्यानी डोळसपणे वाचला नसावा. प्रो. रानडे म्हणतात 'मिस्टिसिझम्' या इंग्रजी शब्दाचा खरा अर्थ अनुभूती किंवा ईश्वराचा साक्षात्कार असा आहे. परंतु त्याचा 'अद्भुत चमत्कार' किंवा गूढ शक्ति असा विपरीत अर्थ सामान्यतः करण्यात येतो ही दुर्दैवाची गोष्ट होय.[१०] प्रो. रानडे ह्यांनी अतींद्रियज्ञानाच्या प्रकरणात कोणत्याच चमत्कारांची चर्चा केली नाही. एवढेच नव्हे तर त्यांनी ज्ञानदेवांचे जे त्रोटक चरित्र सांगितले आहे त्यातही 'सच्चिदानंदबाबांना ज्ञानदेवांनी दुर्धर रोगापासून वाचविले' असा लौकिक पक्षच मांडला असून दुसरे कोणतेही चमत्कार वर्णन केलेले नाहीत. असे असता चमत्कारांचा पक्ष हिरीरीने मांडण्यासाठी व चमत्कारांच्या शक्यतेची जाहिरात करून भोळसट भाविकांचा बुद्धिभ्रंश करून स्वतःचा स्वार्थ साधणाऱ्या काही पोटार्थी साधकांनी ज्ञानदेवांनी चमत्कार केले व ते यौगिक प्रक्रियांनी शक्य होतात असा प्रचार करून स्वतःकडे अध्यात्मिक नेतृत्व कायम ठेवण्यासाठी प्रो. रानडे सारख्यांची अवतरणे दिलेली असतात. पण प्रो. रानड्यांना जे अभिप्रेत नाही ते अशा साधकांनी सांगितलेले असते. ज्ञानदेवांनी जे चमत्कार दाखविले ते कुंडलिनीजागृती व षट्चक्रे भेदन ह्यांनी शक्य नसतात. या प्रक्रियाद्वारा योग्यांचा देह शिवाच्या सामरस्यासाठी अथवा निरंजनी अवस्थेचा अनुभव घेऊन देहातीत होण्यासाठी तयार होतो. ज्ञानदेवांना एवढेच अभिप्रेत आहे. असे असूनही इ. स. १९६९ मध्येही प्रसिद्ध झालेल्या ज्ञानेश्वरीच्या आवृत्तीत कै. सोनोपंत दांडेकरांनी रेड्याच्या वेदपठणाचा कार्यक्रम ठेवला आहेच. पण पातंजलयोगसूत्रे अथवा नाथयोगसूत्रे यातील कोणत्या सूत्राद्वारे तो कसा शक्य आहे ते मात्र चमत्कारांचा पक्ष हिरीरीने मांडणारे लेखक सांगत नाहीत. ज्ञानदेवांच्या मध्ययुगीन संत-चरित्रकारानी त्यांच्या चरित्रात चमत्कार पेरलेत त्याविषयी त्या संतांना दोष देता येणार नाही, कारण त्या काळाच्या चौकटीत तयार होणारे साहित्य अंधश्रद्धेने ओथंबलेले आणि भाविक असेच असणार, पण आधुनिक काळखंडात तसेच चरित्र मराठीच्या प्राध्यापकानी सांगावे हे मात्र आश्चर्यकारक आणि

९. ज्ञानेश्वर चरित्र आणि ज्ञानेश्वरी चर्चा. रा. शं. वाळिंबे पान. ३२–३४

१०. मराठी संतवाङमयातील परमार्थ मार्ग. पान. १.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अज्ञवृत्तीचे द्योतक वाटते. यातच श्रोत्यांची स्वयंप्रज्ञा, विचक्षण दृष्टी बंदिस्त करून स्वाधिकारमंडणाची वृत्ती असते.

काही चमत्कार सिद्धींद्वारे शक्य असतात. रासायनिकप्रक्रियाद्वारा पदार्थाचे गुणधर्म बदलविता येतात. संमोहनाद्वारा काही चमत्कार शक्य असतात. भिंत चालविणे, अथवा रेडा वदविणे हे चमत्कार संमोहनाद्वारा शक्य होतीलही पण त्यांत ज्ञानदेव योगी ठरत नसून जादुगार ठरतात. आणि ज्ञानदेवांना ते अत्यंत अन्यायकारक आहे. वियत्‌शरीरावर नियंत्रण प्रस्थापित करूनही सिद्धींचे कार्य करता येते. पण अशा वियच्छरिरांकडून होणारी कार्ये देखील मानवीशक्तीला जे शक्य आहे त्या कक्षेतच केली जातात. आणि योग-शास्त्रांत असा सिद्ध निकृष्ट ठरविला जातो.

## ज्ञानदेवांचा योग

ज्ञानदेव स्वतः योगी नव्हते. ते ऋतंभराप्रज्ञावंत होते. अतींद्रिय अनुभवांची अनुभूतीही त्यांचे ठायी असावी असे म्हणता येते. ज्ञानदेवीची रचना हाच त्यांच्या जीवनातला महत्वाचा चमत्कार होता. गीतेच्या सहाव्या अध्यायाचे विवरण करताना त्यांनी योगतत्वज्ञानाचे विश्लेषण केलेले आहे. त्याचेच कांहीसे विस्तृत स्वरुप त्यांच्या योगपर अभंगमालेत आढळून येते. ज्ञानदेवीच्या सहाव्या अध्यायात योगतत्वज्ञान त्रोटक स्वरूपात असून त्यावरील काव्याचा आणि रूप-कांचा साज विस्तारलेला आहे. पण चक्रांची नावे, चक्रांचे रंग, चार देह, देहांचे वर्ण, पीठे, इत्यादी यौगिक संज्ञांचा परिचय ज्ञानदेवीपेक्षा अभंगातून विस्तृतपणे होतो. ज्ञानदेवांना पातंजलयोगच अभिप्रेत होता असे मत वडेरांनी ज्ञानेश्वर दर्शन खंडात मांडलेले आहे.[११]

डॉ. पेंडसे ह्यांनी 'श्री ज्ञानेश्वरांचे तत्वज्ञान' या ग्रंथात ज्ञानदेवाच्या योगानुभूतीतील अभिव्यक्तीशी स्वात्मारामस्वामीच्या हठयोगप्रदीपिका ग्रंथा-तील श्लोकांशी तुलना करून ज्ञानदेव हठयोगी होते असे दाखविले आहे. डॉ. पेंडसेंचा हा विचार बरोबर असला तरी स्वात्मारामाच्या हठयोगप्रदीपिके-तील श्लोकांचा त्यासाठी आधार घेण्यात कालविपर्यास होतो हे डॉक्टर-साहेबांनी लक्षात घेतले नाही. कारण स्वात्मारामस्वामीचा ग्रंथ ज्ञानदेवोत्तर-कालीन असून स्वात्मारामस्वामीने हठयोगप्रदीपिकेच्या रचनेसाठी मत्स्येन्द्र गोरखाच्या ग्रंथाचा आधार घेतला होता. 'हठविद्यां हि मत्स्येन्द्र गोरक्षाद्या

११. श्री ज्ञानेश्वर महाराज व योगशास्त्र. श्री. वडेरांचा लेख. पान ३००. भाग २



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

विजानते । स्वात्मारामोऽथ वा योगी जानीते तत्प्रसादतः ।। ४ ।।[१२] असा ग्रंथकर्त्याचा ऋणनिर्देश आहे. हठयोग प्रदीपिकेवर ज्योत्स्ना नावाची टीका रचणारा ब्रह्मानंद देखील 'सुविज्ञायगोरक्षसिद्धान्तहार्दम्' असा निर्देश करून हठयोग प्रदीपिकेच्या निर्मितीच्या मुळाशी गोरक्षनाथांची हठयोगप्रदीपिका असावी असाच संकेत करून देतो आणि हठयोगप्रदीपिकेतील कित्येक अवतरणे गोरक्षनाथांच्या 'योगमार्तंड' प्रकरणात जशीच्या तशी आहेत. त्यावरून ज्ञानदेवांचा योगमार्ग शोधून पाहता 'योगमार्तंड' ह्या प्रकरणातील संस्कृत अवतरणाशी त्यांच्या विचारांचे साम्य शोधून पाहाणे योग्य झाले असते. पण डॉ. पेंडसेच्या संशोधन काळात हे साहित्य अनुपलब्ध असावे. 'पिंडानेच पिंडांचा ग्रास करावयाचा' अथवा देहानेच विदेही अवस्था साधावयाची, किंवा जीवाच्या माध्यमातून वा इंद्रियांद्वाराच परमशक्तीशी तादात्म्य साधावयाचे हेच नाथयोगाचे ध्येय होते. 'योगश्चित्तवृत्तिनिरोधः' असा नाथ योगांचा प्रस्ताव नसून कुंडलिनीद्वारा अमृतप्राशनाने अमृतत्वप्राप्ती हे नाथयोगाचे ध्येय आहे. या अवस्थेला मत्स्येंद्रनाथ 'सहजानंदी' अवस्था म्हणतात. तात्पर्य नाथयोगाची अंतिम अनुभूती सहजानंदी अवस्था असून पातंजलयोगाची अंतिम अवस्था 'निर्विकल्प समाधीची' अवस्था आहे. ज्ञानदेवांना ही सहज अवस्था अभिप्रेत आहे. सहजानंदं न विन्दन्ति सर्वधर्म समासृताः (अकूलवीरतंत्र अ. श्लोक ५) असे मत्स्येन्द्रनाथ सांगतात आणि 'परमामृतसन्तृप्ताः सहजानन्दं च केवलम्' असे ते (अकूलवीर तंत्र ब. श्लोक १४०) पुन्हा सांगतात. 'स्वभावमतिमतं शान्तं मनो यस्य मनोगतम्' अशी त्यांनी सहजपदाची व्याख्या केलेली आहे.

देहांतर्गत शक्तींना मत्स्येंद्र सहजा अथवा कुलजा म्हणतात. 'शक्तियुक्तो महात्मानः सहजा कुलजापि वा' (कौलज्ञाननिर्णय ८–६) असे सांगून 'कुरुते देहमध्ये तु सा शक्तिः सहजा प्रिये' असे त्या शक्तीचे वर्णन करतात. खेचरीमुद्रेने जी अमृतपानाची प्रक्रिया सांगितली आहे तिचे वर्णन करताना मत्स्येन्द्र म्हणतात 'लीयन्ते खेचरीचक्रे क्षोभयेत् परमामृतम् ।। अमृतेन विना देवी अमरत्वं कथं प्रिये ।। अमृतं कौलसद्भावं श्रुणु कामकलात्मकम् ।। सहजान्तस्थितं तत्वं स्फुरन्तं मणिनिर्मलम् । मुक्ताफलसमौपम्यं खद्योतसदृशं प्रिये ।। (कौलज्ञाननिर्णय-प्रकरण १४–९३–९५) मत्स्येन्द्रनाथाचे सहजतत्व आकाशगुंफेला उद्देशून त्यांनी म्हटलेले आहे. अर्थात ती निरंजनी वा जीवशिवाच्या सामरस्याची अवस्था होय. 'सहजं स्वात्मसंवित्तिः' अशी सहजपदाची व्याख्या गोरक्षनाथांनीही

१२. अकूलवीर तंत्र अ



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

केलेली आहे. सहजावस्था प्राप्त झाली की 'नाधारलक्षभेदन्तु न नादगोचरे पठेत् ॥' (श्लोक १५) न इडापिङ्गला शांता न चास्तीति गमागमे (श्लोक १६) न बिन्दु भेदके ग्रन्थौ ललाटे न तु बन्हिके (श्लोक १८) अशा तऱ्हेची अनुभूती त्यांनी दिलेली आहे. ज्ञानदेव म्हणतात, 'तया अनाहताचेनि मेघे। मग आकाशे दुमदुमो लागे। तव ब्रह्मस्थानिचे वेगे। फिटले सहजे ॥ ६ २७९ ॥ ही सहजावस्था प्राप्त झाली की 'तैसे शक्तीचे रुप मावळे। शक्तीची माजी' (६-२८७) आता नाद बिंदु नेणी जे। कला ज्योती (६-२८८) मनाचा हन मारु। का पवनाचा धरु। ध्यानाचा आदरू। नाही परी (६-२८९) ज्ञानदेव म्हणतात की महाविष्णूने ध्वनिताचे केणे रचले तेच मी विस्ताराने मांडले. तात्पर्य ज्ञानदेवांनी सांगितलेला योग महाविष्णूचा म्हणजेच मत्स्येन्द्रनाथाचा कौलागमी योगमार्ग असून तोच त्यांनी गीतेत आणि अभंगात विस्ताराने मांडला. तोच ज्ञानदेवांचा सहज योग असून परमभक्तीच्या पंथांनी तो प्रगट झाला. आणि हाच सहज पंथ पुढे कबिराच्या तत्त्वज्ञानातूनही भक्तीच्या अमृतप्रवाहात झिरपू लागला. ज्ञानदेव भागवत आणि शैव तत्वज्ञानाशी परिचित असले तरी ते सहजयानातील ज्ञानभक्तीचे उद्‌गाते होते असे दिसते. 'या ज्ञानभक्ती सहज। भक्तु एकवटला मज। तौ मिची केवळ हे तुज। श्रुतही असे। १८॥ ११३०॥ ते हे कल्पादि भक्ती मियां। भागवतमिषे ब्रह्मया। उत्तम म्हणौनि धनंजया। उपदेशिली। १८-११३२॥ ज्ञानी इयेते स्वसंविति। शैव म्हणती शक्ती। आम्ही परमभक्ती। आपुली म्हणो॥ १८-११३३॥

ज्ञानदेवीच्या सहाव्या अध्यायात ज्ञानदेव म्हणतात 'तो हा नाथ संकेतीचा दंशु। पिंडे पिंडाचा ग्रासु। परि दाऊनि गेला उद्देशु। महाविष्णु ॥ ६-३९१ ॥ तया ध्वनिताचे केणे सोडुनी। यथार्थाची घडी झाडुनी। उपलविली म्या जाणुनी। ग्राहीक श्रोते। ६-२९२॥.

नित्यान्हिकतिलक नावाच्या प्रकरणात मत्स्येंद्राचे नाव विष्णुशर्मा असेच दिलेले आहे.[१३] नाभादासाच्या छप्पायीवरुन देखील 'विष्णुस्वामी संप्रदाय दृढ ज्ञानदेव गंभीर मती' या उल्लेखावरुन ज्ञानदेव विष्णुस्वामी संप्रदायाचे अनुयायी होते असे दिसते. 'मत्स्याच्या उदरा आत। महाविष्णु मच्छेंद्रनाथ ॥' अशी ओवी

१३. कौलज्ञान निर्णय प्रस्तावना पान. ६८ संपादन डॉ. प्रबोधचंद्र बागची.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सिद्धान्तसारातही आहे. गोरक्षकिमयागारात मत्स्येंद्रास महाविष्णुसाई असे म्हणतात. त्यामुळे 'पिंडे पिंडाचा ग्रासु' हे जे देहानेच देहाचा लय करण्याचे तत्वज्ञान आहे ते महाविष्णुस्वामी अथवा मत्स्येंद्राचे तत्वज्ञानच ज्ञानदेवांनी गीतेतून विस्तारले असे समजते. पतंजलीच्या योगशास्त्रांत कुंडलिनीजागृती, षट्चक्रभेदन इत्यादी प्रक्रिया सांगितलेल्या नाहीत. त्याचा प्रथम शोध कौल-ज्ञाननिर्णय या ग्रंथातूनच घ्यावा लागतो. तत्पूर्वी त्या साधना वज्रयानी पंथाने प्रचारात आणल्या. सहजयानी साधकांच्या दोह्यातून कांही यौगिक प्रक्रियांचे वर्णन ज्ञात होते. नाडींचे ज्ञान वज्रयानी तंत्रातून उपलब्ध होते. अवधूती या मध्यम नाडीतून बोधीचित्ताचा प्रवाह वाहतो आणि या बोधीचित्ताचा प्रवास उष्णीशनावाच्या कमळापाशी थांबला की सहजानंदी अवस्था प्राप्त होते अशी वज्रयानीतंत्रांची धारणा आहे. मत्स्येंद्राच्या कौलागमामागे सरहपाद, कृष्णपाद अशा सहजयानी पंथातील सिद्धांचे तत्वज्ञान होते.

जसे कुकुरीपादाच्या चर्यागीतीत[१४] त्यांनी सांगितले आहे 'रुखेर तेंतलि कुम्भीरे खाअ' (चर्या २) देह नावाच्या वृक्षाची फळे कुम्भकाने खाऊन टाकावयाची. त्यावर टीकाकार म्हणतो 'कुम्भक समाधीना स्वानुभवक्रमेण च तस्य भक्षणं निःस्वभावीकरणं कुर्वन्ति ।। विरुवापादांच्या रचनेतही 'एक से शुण्डिनि दुइ घरे सान्धअ' (चर्या ३) असा उल्लेख असून तो टीकाकाराच्या स्पष्टीकरणानुसार अवधूतीच्या चंद्रसूर्यांच्या घरातून प्रवासाचा उल्लेख असून सहजपदाला प्राप्त होण्याचा अमृतपानाचा योग आहे ('सहजे थिर करी वारुणि सान्धे । जे अजरामर होइ ॥') तशीच गुण्डरीपादांचीही रचना आहे 'तिअड्डा चापी जोइणि दे अङ्कवाली । कमलकुलिश घाण्ट करहुँ विआली ॥ १॥ जोइनि तइ बिनु खणहि न जीवमि । तो मुह चुम्बी कमलरस पिबमि ॥ खेपहु जोइनि लेष न जाअ । मणिकुले बाहिआ ओडिआणे समाअ ॥ २॥

ललना, रसना आणि अवधूतिका या तीन नाड्यांना (तिअड्डा = त्रिकोण) चेपून जोगिनी साधकाला मीलनसुखाचा आनंद देते (दे अङ्कवाली = मांडीत जागा) आणि तेथील कमलजागृतीने कालरहिततेचा भास होतो. त्यानंतर पुन्हा उष्णीशकमलातील रसपानाची प्रक्रिया दिलेली असून ओड्डीयान बंधाचाही निर्देश आहे.

---

१४. चर्यागीतीकोश. डॉ. प्रबोधचंद्र बागची.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'वामदाहिण चापी मिलिमिलिमाङगा। वाटत मिलिल महासुख साङ्गा ।।' या कम्बलाम्बरपादाच्या गीतीत, उजवीकडील व डावीकडील चंद्रसूर्याचा निर्देश असून यातील मध्यममार्गातून महासुखाची अवस्था लाभेल असा आशय व्यक्त केला आहे. कान्हपादाच्या चर्यागीतीत कमलपुष्पावर डोम्बीचे नृत्य वर्णन केलेले आहे 'एक सो पदुमा चौषठी पाखुडी। तही' चढी नाचअ डोम्बी बापुडी ।। (चर्या १०). कृष्णाचार्यपाद म्हणतात 'नाडि शक्ति दिढ धरिअ खाटे। अनहा डमरू बाजइ वीरनादे ॥ ९॥' आलि कालि घण्टा नेउर चरणे। रविशशि कुण्डल किउ आभरणे ॥ २॥ या चर्येत अनाहतनाद, आलि, आणि काली या बौद्धतंत्रातील नाड्या, रवि आणि शशी यांचा उल्लेख आहे. नाडिशक्ति म्हणजे अवधूतिका नाडी, (खाटेवर) गगनावर दृढ कर, म्हणजे अनाहत नाद ऐकू येईल. असा या चर्येचा अर्थ आहे कृष्णपाद पुढे म्हणतात 'मारिआ सासु नणन्द घरे शाली। माअ मारिआ काहन भइल कवाली।' (चर्या ११) या चर्येत सासु श्वासाला म्हटले असून टीकाकार या श्वासाला मनपवन म्हणतो. (मनःपवनं) नणन्द हे रूपक 'चक्षुरिन्द्रियादि विज्ञानवातं' यासाठी वापरले असून यांचा निरोध करावयाचा आहे. 'माअमारिया' हे रूपक मायेला उद्देशून आहे. डोम्बीपादांनी गंगा आणि यमुना या नाड्यांचा निर्देश केला असून त्यामधून वाहणाऱ्या अवधूतीका नाडीवर रूपक योजले आहे 'गंगा जउना माझे रे बहइ नाइ (नौका)। (चर्या १४). पुढे डोम्बीपाद म्हणतात 'तंही बुडीली मातङ्गीपोइआ लीले पार करेइ ॥' या चर्येवर टीकाकाराचे भाष्य महत्वाचे आहे. 'तत्र स्थित्वा सहजयानप्रमत्ताङ्गी डोम्बी नैरात्मा संसारार्णवे योगीन्द्रं पारं करोति ।।'

वर दिलेल्या साधकांची ही योगसाधना सहज योगसाधना आहे कारण या साधकांनी परमपद अवस्थेला सहज असेच म्हटले आहे. 'सहजे थिर करी वारुणि सान्धे। जे अजरामर होई (चर्या ३) 'सहजनलिनीवनं प्रवेश्य निवृतः' (चर्या ९) 'रवणइ न छाडअ सहज उन्मत्तो' (१९) 'चलिअउ ससहर मागे अवधूइ। रअणप्रभाव हु सहजे कहेइ ॥. (चर्या २७) 'भुसुक भणइ मइ बुझिअ मेले। सहजानन्द महासुख लीले ।।' 'अनुभव सहज मा भोल रे जोई' (३७)

'भण कईसे सहज बोलवा जाअ। काअ वाक् चिअ् जणु ण समाअ' असे काहनपाद सांगतात. (४०) तात्पर्य मत्स्येंद्राच्या यौगिक पार्श्वभूमीला चर्यागीतीकारांची यौगिक धारणा होती आणि त्या यौगिक अनुभूतीची परमोच्च


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अवस्था त्यांनी 'सहजानंद' या संज्ञेने व्यक्त केली होती. सहजावस्था ही खसम अवस्था, निरंजनावस्था, महासुख अवस्था असून या साधकांनी जीवशिवाचे सामरस्य सांगितले नसून बोधीचित्ताची उष्णीश कमलाशी तद्रूपता सांगितली आहे. या योगसाधनेत कुण्डलिनीचा निर्देश नसून अवधूतिकेचा निर्देश असून अवधूतिकेचे अमृतपान सांगितलेले आहे. मत्स्येंद्रांच्या योगावर जसा सहजयानी साधकांचा प्रभाव दिसतो तसाच शैवतत्वांचाही प्रभाव दिसतो. बंगालात पालराजवटीत बौद्ध आणि शैव यात सामंजस्याचे वातावरण दिसते त्याचा शोध मत्स्येंद्र प्रणीत नाथयोगातील तत्वज्ञानातून घेता येईल. बौद्ध आणि शैव तत्वज्ञानाला एका स्रोतांत आणण्याचे कार्य प्रथमतः मत्स्येंद्राने केले असावे. मत्स्येंद्रांच्या तत्वज्ञानावर सहजयानी प्रभाव कायम आहे. मत्स्येंद्रांच्या परंपरेतील आदि साधक सरहपाद यांनी देखील परमसुख अवस्थेला सहजानंदी अवस्था असेच गौरविले असून मत्स्येंद्राची अकूलवीर तंत्रातील साधकाची परमोच्चपदी असणारी अवस्था आणि सरहपादानी परमपदातील अनुभूतीची दिलेली अभिव्यक्ती परस्पराशी समान आहे. सरहपादानी ब्राह्मण, पाशुपत, जैन, बौद्धमत यांचे खंडण केले आहे.[१५] 'सहज च्छाडी णिब्बाणेही धाविउ। णउ परमत्थ एकवि साहिउ ॥.' असे ते म्हणतात. सहजयानानेच निर्वाण शक्य आहे. अन्य मार्गांनी परमार्थ साधत नाही. 'सहज स्वभाव' असे सांगून सरहपाद परमपदाचे वर्णन करताना म्हणतात 'इन्दी जन्थ विलीन गउ णठ्ठो अप्प सहाव' (इंद्रिये जिथे विलीन झाली असून निःस्वभावता आली आहे) 'सो हले सहजानन्द' अशा सहजानन्दी अवस्थेत 'जहि मण्ण मरइ (जिथे मन मेले असते) 'पवणहो तहि खअ जाइ' (पवनाचा मनपवनाचा क्षय झाला असतो) या सहजावस्थेत 'भावाभावे वेण्णी न काज' (भावाभावाचे निर्मूलन होते) 'इन्दि विसअ न ठाय' (इंद्रियाचे विषय लोपले असते) 'ते झाण रहिअ (ध्यानरहित) आणि अवाच्च (अनिर्वचनीय) असते तिथे 'मन्त ण तन्त ण ध्येय ण धारण' अशी अवस्था असते. कारण हे सारे 'विभम कारण' (विभ्रमास कारण) असतात. मन निम्मल सहजावत्थे गऊ अरिउल नहि पवस' 'मन निर्मल सहजावस्थेला गेले की तेथे षड्रिपूंचा प्रवेश होणार नाही, 'जिम लोण विलिज्जइ पाणिएही तिम जइ चित्तवि ठाइ। अप्पा दीसइ परहि सम तत्थ समाहिए काइ' (जसे मीठ पाण्यात विरघळते तसे चित्त त्या ठायी विरघळले की आपपर भावना लुप्त होते आणि तीच समाधी अवस्था

१५. दोहाकोश संपादन राहूल सांकृत्यायन.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

होय. ) त्या परमपदाचे ठायी मनपवनाचा संचार नाही ( जहि मन पवण ण संचरइ ) रविशशीलाही प्रवेश नाही ( रविससि नाहि पवेस ) तिथे द्वैत नाही. तिथे फक्त एकच रंगाची दुनिया असते. ( एक्के रंगे रञ्जिआ ) त्रिभुवनही अरोष झाले असते. 'आइ ण अन्त ण मज्झ तहि. णउ भव णउ निव्वाण ।' (तिथे अन्त नाही आदि नाही भव नाही निर्वाण नाही. आपपर ही भावना नाही. ( अप्पापरहि ण मेलविउ ) गमणागमनाचा भाव नाही. (गमणागमण न भाग्ग.)

सहजावस्थेला सरहपाद नाथ अवस्था म्हणतात. 'जत्तइ चित्तहु विपुरइ तत्तइ णाहु सरुअ.* (नाथस्वरूप) 'तरंग आणि पाणी यात जसा भेद नसतो तसाच भव आणि आकाश यात भेद नाही ' सहजस्वभाव अमृतासारखा आहे. ( सहज सहावा हले अमिअरस ) जसे जलात जल समरस होते तसे तिथे चित्त समरस झालेले असते. तिथे ऋधीसिद्धी नसतात. पापपुण्याचा तिथे पाड नसतो. (रिद्धि सिद्धी हले वेण्णी न काज । पापपुण्ण तहि पाडहु बाज) इंद्रजाल तुटलेले असते. प्राणायामादि धारणा नसतात. षट्चक्रभेदन नसते. नासाग्रादि कष्टदायक योग नसून बिन्दुधारणा नसते. ( पवण धरि अप्पाण न भिन्दइ । कट्ठ जोअ नासाग्ग न विन्दह ) ज्यावेळी मन अस्ताला जाते ( जब्बे मन अत्थमणु जाइ तणु तुट्टइ बन्धण ) त्यावेळी शरीराचे बंधनही तुटलेले असते. त्या समरस अवस्थेत कोणी ब्राह्मण नसतो कोणी शूद्र नसतो. (तब्बे समरसहि मजझे । णउ सुद्द ण ब्राह्मण ॥ 'धेअ न धारण मन्त तहि, णउ तहि सिव सत्ति ।' लक्खालक्ख विणहि न्तेही । णउ तेही भाव पसत्ति ॥ नउ तहि णिन्दा णउ सिविन, णउ जागर, सुसुत्त ' भावाभाव णिबन्दणु णउ तहि थावकअ चित्त ॥ '

अर्थातच ध्येय धारणा मंत्र तंत्र. तिथे नसतात शिवशक्ती नसते. लक्षालक्ष विरहित अशी ती अवस्था असून निद्रा, स्वप्न, जागृति, सुषुप्ती ह्यांच्या पार अशी ती अवस्था असते.

सरहपादांनी निरंजनपदाचे जे वर्णन दिलेले आहे तेच मत्स्येन्द्राच्या अकुलवीरतंत्रातही प्रगट झालेले आहे. हे अकुलवीर तंत्र सिद्धनाथानी सांगितले आहे असे म्हटले आहे. (हे तंत्र प्रकरण मीननाथाचे असावे आणि या प्रकरणातील तत्वज्ञान त्यांनी मत्स्येद्रनाथांकडून घेतले असावे ) यथा नदीनदाः सर्व्वे सागरे समुपागताः । तथा अकूलवीरेषु सर्व्वधर्मा लयङ्गताः ॥ असाच

* नाथसंप्रदायाचा उद्‌गम सरहपादापर्यंत नेता येतो.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मीननाथांचा प्रस्ताव आहे. असे सांगून न्यायवैशेषिक, बौद्ध, अरहन्त, सोमा- सिद्धान्ती, मीमांसक, पञ्चस्तोत्र, शैवागमातील तत्वज्ञानाची 'विकल्प बहुलाः सर्वैः मिथ्यावादा निरर्थकाः (१०) अशी संभावना केली आहे. 'न ते मुञ्चति संसारे अकुलवीरविवर्जिताः।' असाच त्यांचा सरहपादां- प्रमाणे दावा आहे. 'न नाभिचक्रकण्ठे न च शिरे नैव मस्तके। तथा चक्षुरुन्मीलते च न नासाग्रनिरीक्षणे' ॥१७॥ 'न मनो, न च वै बुद्धिः न चिन्ता चेतनादिकम्। न कालः कलनाशक्तिः न शिवो न च इंद्रियः ॥३५॥ ज्वलज्वलनभूम्या च आपोऽन्चैव तथैव च। सर्वं समरसं पूर्णं अकुलवीरन्तु केवलम् ॥४१॥ न जपो नार्चनं स्नानं न होमं नैव साधनम् ॥४४॥ गच्छन् तिष्ठन् स्वपन् जाग्रत भुज्यमाने च मैथुने। भवदारिद्रशोकैश्च विष्ठमूत्रादिभक्षणे ॥६७॥ विचिकीत्सा नैव कुर्वीत इंद्रियार्थैः कदाचन। आचरेत् सर्ववर्णानि न च भक्षं विचारयेत् ॥६८॥

मत्स्येन्द्रनाथांनी वर्णिलेली अकुलवीराची परमोच्च अध्यात्मिक अवस्था आणि सरहपादांनी सांगितलेली निरंजन वा सहजानंदाची अवस्था या दोहोंची अनुभूती एकच आहे असे लक्षात येईल.

नाथपंथाचा उदय सरहपादांपासून असून हाच योग मत्स्येंद्र, मीन गोरख, गहिनी, निवृत्ती या परंपरेने ज्ञानदेवांना लाभला.

कौलज्ञाननिर्णय ग्रंथात कुण्डलिनीचा निर्देश आहे.

'आपादतलमूर्द्धान्ता वामाख्यं कुण्डलाकृतिम्।
गुदस्थमुदयन्तस्था द्वादशान्ते लयं पुनः (१७-२३)
एवं तु चरते हंसो देहमध्ये शुभाशुभे
निर्लेपं निष्कलं चोर्द्धे शुद्धमत्यन्तनिर्मलम् ॥ (१७-२४)

पाचव्या पटलात चंद्रामृताचा निर्देश असून अमृतस्रावाचा निर्देश आहे.

सितञ्च शीतलन्दीव्यं सुगन्धं भूरितेजसम्।
चन्द्राल्हादकरं दिव्यम् आगच्छन्तं खमध्यतः ॥ ५-६ ॥
स्रवन्तं बहुरन्ध्रेण अचिरान्मृत्युजित् भवेत्
न जरामरणन्तस्य व्याधिरोगो न विद्यते ॥ ५-७ ॥



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सहाव्या पटलात मृत्युंजय अवस्था प्राप्त करून घेण्यासाठी

प्रसार्य्य दन्तुरायान्तु यावद्‌ब्राह्मविलङ्गतः ।

अमृताग्रं रसाग्रेण दह्यमानसुधीरपि ॥ १८ ॥ अशी साधना सांगितलेली आहे. 'लीयन्ते खेचरीचक्रे क्षोभयेत् परमामृतम्' ॥ (१४–६३) 'अमृतेन विना देवी अमरत्वं कथं प्रिये' (१–९४) सहजान्तस्थितन्तत्वं स्फुरन्तं मणिनिर्मलम् ॥ (१४–९५) सहजन्तुं इमं चक्रं वज्रनामातिकोद्‌भवं । वज्रप्रयोगेण वज्रवत् भवते नरः ॥ ( १५–१० ) इत्यादि अवतरणावरून मत्स्येन्द्राचा योग सहजयोग असावा आणि शिवशक्तीसमायोगानंतरच्या भावाभावातीत, द्वन्द्वातीत अवस्थेला अकूलवीरतंत्रात त्यांनी सहजअवस्था म्हटले आहे. मत्स्येन्द्र नाथाचा योगमार्ग गोरखनाथांनी विस्तारून प्रतिपादन केला आहे. 'मानसपूजा' ग्रंथात सच्चिदानंदांनी बहुधा मत्स्येंद्राचा योगमार्ग सांगितला असावा. कारण केला 'मानसपूजा' ग्रंथ । त्यातील विष्णुरहस्यतत्व । अति गुप्त जे' अशी ओवी आहे.

— अपूर्ण


# महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना

लेखक—चा. अ. दाभोलकर

किं. २ रुपये

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई ( सातारा )





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

डॉ. वा. वि. मिराशी

# रावणाच्या लंकेचे स्थान

हा विषय गेल्या पन्नास–पंचावन वर्षात मोठा वादग्रस्त झाला आहे. इंदूरचे सरदार माधवराव किबे यांनी १९१९ साली पुण्यात भरलेल्या अखिल-भारतीय प्राच्यविद्या परिषदेच्या अधिवेशनात वाचलेल्या आपल्या निबंधात असे प्रतिपादिले की रामायणाच्या किष्किन्धाकांडात सुग्रीवाने सीतेच्या शोधार्थ वानरांना पाठविताना देशांचा जो निर्देश केला आहे त्यावरून रावणाची राजधानी लंका मध्यभारतात विंध्यपर्वतात अमरकंटकजवळ होती त्यानंतर त्यांनी आणखी काही पुरावे पुढे मांडून त्याच मताचा पुरस्कार दोन तीन लेखात केला.[1] या मताला तत्कालीन मध्यप्रांतातील पुरातत्त्वज्ञ रावबहादूर हीरालाल यांनी अधिक प्रमाणे देऊन पाठिंबा दिला.[2] यासारख्याच मताचा पुरस्कार नंतर श्री. परमशिव ऐयर[3] आणि श्री. जी. रामदास यांनी केला.[4] अलीकडे डॉ. ह. धी. सांकलिया यांनी हे मत स्वीकारले असून त्याचे प्रतिपादन आपल्या अनेक इंग्रजी, हिंदी व मराठी लेखात व नंतर प्रकाशित केलेल्या आपल्या 'वाल्मीकि–रामायण (एक पुरातत्त्वीय अध्ययन)' या पुस्तिकेत केला आहे. त्या पुस्तिकेचे परीक्षण केसरी, नागपूरचे तरुण भारत इत्यादि वृत्तपत्रात आले आहे, पण त्यात त्यांच्या मताचा केवळ परिचय दिला आहे, त्यांनी पुढे मांडलेल्या प्रमाणाची फारशी चिकित्सक छाननी केली नाही. हा विषय वादग्रस्त झाला असला तरी भारतीय इतिहास व संस्कृतीच्या दृष्टीने महत्त्वाचा आहे. सत्यान्वेषणार्थ त्याची चर्चा होणे अत्यावश्यक आहे. म्हणून तसा प्रयत्न येथे केला आहे.

---

१. Indian Historical Quarterly, Vol. IV, PP. 694 f.; H. W. Thomas Volume, pp. 144 f.; P. K. Gode Volume, pp. 93 f.

२. Ganganath Jha, Commemoration Volume pp. 151 f.

३. यांचे Ramayana and Lankā हे पुस्तक पहा.

४. Ind. Hist. Quart. Vol. IV, pp. 339 f.; ibid. Vol. V pp. 281 f.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वास्तविक पाहता आपल्या प्राचीन ग्रंथकारांत या बाबतीत मतभेद नाही. रामचरितावर ज्यांनी ज्यांनी लिहिले आहे त्या सर्वांनी सिंहलद्वीप ( सध्याची श्रीलंका ) या बेटावरच रावणाची राजधानी होती असे मानले आहे. या ग्रंथकारांमध्ये सर्वांत प्राचीन कालिदास होय आपल्या रघुवंशाच्या तेराव्या सर्गात त्याने भगवान् रामचंद्राचा लंकेपासून अयोध्येपर्यंतचा विमानातून प्रवास वर्णिला आहे. त्यात लंकेचे पूर्वोक्त स्थानच गृहीत धरले आहे. त्यानंतरच्या भवभूतीला उत्तररामचरितातील उल्लेखांवरून अगस्त्याश्रम मध्य भारतात नसून अहमदनगर जिल्ह्यातील नेवासे जवळ होता हेच अभिप्रेत होते हे आम्ही इतरत्र सिद्ध केले आहे[५] अर्थातच तो गोदावरी, किष्किंधा, पंपा इत्यादि स्थळे दक्षिणभारतातच होती, असे मानीत होता हे स्पष्ट आहे, त्यानंतरच्या मुरारी, राजशेखर, जयदेव इत्यादि संस्कृत नाटककारांना हेच मत मान्य होते हे त्यांच्या नाटकांतील वर्णनावरून दिसते.[६] तेव्हा आपल्या प्राचीन ग्रंथकारांमध्ये या बाबतीत मतभेद नाही.

पण अलीकडच्या संशोधकांनी लंकेच्या स्थानाविषयी विविध मते प्रतिपादिली आहेत. सुप्रसिद्ध जर्मन प्राच्यविद्याविशारद याकोबी याने लंका आसामात होती असे प्रतिपादले होते. पण हे मत इतके विलक्षण व सकृद्दर्शनीच असंभाव्य आहे की त्याच्या निराकरणाची जरूरी नाही. त्यानंतर सरदार किबे यांचे ती अमरकंटकजवळ होती हे मत, याशिवाय श्री. परमशिव ऐयर यांनी लंका ही जबलपूरच्या उत्तरेस अठरा मैलावरील इंद्राणा नावाच्या खेडेगावाजवळच्या डोंगरात करण्याचा प्रयत्न केला आहे आणि डॉ. सांकलिया यांनी त्यांच्या मताला पाठिंबा दिला आहे. या दोन्ही मतात एकवाक्यता नसली तरी त्या दोन्हीत लंका मध्यभारतातील विंध्य पर्वतात किंवा त्याच्या थोडे उत्तरेस होती हे साम्य आहे. तेव्हा या मतांच्या प्रतिपादकांनी स्वमतसिद्ध्यर्थ जी प्रमाणे मांडली आहेत त्यांची सत्यासत्यता ठरविली पाहिजे. त्यांचा यथाक्रम विचार करू —

प्रमाण पहिले -

रामायणात वर्णिलेला रामाचा चित्रकूटापासन किंकिंधेपर्यंतचा मार्ग— श्री. किबे यांनी रामायणातील श्लोक उद्‌धृत करून हा मार्ग पुढीलप्रमाणे दाखविला आहे.

---

५. संशोधनमुक्तावलि, सर ६, पृ. १ इत्यादी

६. आमचा भवभूति ग्रंथ, पृ. ३५३ इ.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

" राम मन्दाकिनी नदीजवळ चित्रकूट पर्वतावर आले तेव्हा त्याना सीतेच्यामुळे खरादि राक्षस तेथील ऋषींना त्रास देऊ लागल्याचे समजले. तेव्हा त्यांनी तेथून दण्डकारण्याला प्रयाण केले. तेथे त्यांनी विराध राक्षसाला ठार मारले आणि नंतर ते शरभंगाच्या आश्रमास गेले. शरभंगाने त्यांना मन्दाकिनीच्या तीरावर असलेल्या सुतीक्ष्णाच्या आश्रमास जाण्यास सांगितले आणि स्वतः त्याने अग्निप्रवेश केला. नंतर सुतीक्ष्णाला वंदन करून हे दूर अंतर पार केल्यावर ते पञ्चाप्सर नामक एक योजन विस्तीर्ण असलेल्या तलावाला जाऊन पोचले. नंतर तेथून निघून ते अनेक आश्रमांत कोठे चार, तर कोठे पाच, सहा किंवा दहा महिने राहत दहा वर्षे घालवून पुनः सुतीक्ष्णाच्या आश्रमात परत आले. तेथे काही काळ राहिल्यावर रामाने अगस्त्याश्रमाचा मार्ग विचारल्यावरून सुतीक्ष्ण ऋषि म्हणाले, 'येथून चार योजनावर अगस्त्याच्या भावाचा आश्रम आहे. तेथून एक योजनावर अगस्त्याचा आश्रम आहे.' रामाने तेथे गेल्यावर अगस्त्य ऋषींना आपल्या निवासाकरिता शांत अशा स्थलाविषयी विचारले. तेव्हा अगस्त्य ऋषी म्हणाले, 'येथून दोन योजनांवर फलमूलादिकांनी युक्त असे घनदाट छायेचे पंचवटी नामक स्थान आहे तेथे तुम्ही राहावे. पंचवटीत असताना रामाने खरादी राक्षसांचा वध केला. रावणाने सीताहरण केल्यावर राम व लक्ष्मण पम्पेस गेले. तेथे त्यांना सुग्रीव भेटला. त्याने रामाला म्हटले; हा वालिशासित मलयगिरि आहे येथे मुळीच भय नाही. तेथे राम व लक्ष्मण ऋष्यमुक पर्वतावर राहिले तेथून जवळच वालीची राजधानी किष्किंधा होती. तिच्या पश्चिमेस रक्तवर्ण जलाचा सागर होता -

ततो रक्तजलं भीमं लोहितं नाम सागरम् ।[७]

वालीवधानंतर सुग्रीवाने चारी दिशांस सीतेच्या शोधाकरिता आपले वानरदूत पाठविले पण कोणालाही तिचा पत्ता लागला नाही. शेवटी हनूमान विंध्यपर्वतावर आला तेथे त्याला जटायूचा वडिल भाऊ संपाति भेटला तो त्याना म्हणाला—

इतो दूरे समुद्रस्य संपूर्णे शतयोजने ।
तस्मिल्लंकापुरी रम्या निर्मिता विश्वकर्मणा ॥[८]

' येथून दोनशे योजन अंतरावर समुद्रात लंका ही सुंदर नगरी आहे.'

---

७. किष्किन्धाकाण्ड ३९.३४ हा व यापुढील संदर्भ बडोद्याच्या ओरिएंटल इन्स्टिटयूटने संपादिलेल्या चिकित्सक आवृत्तीला अनुलक्षून आहेत.

८. किष्किंधा ५७,२०.



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

चित्रकुटापासून किष्किंधेपर्यंतच्या रामाच्या प्रवासाचे वरील संक्षिप्त वर्णन देऊन श्री. किबे त्यांच्या मधील अंतर पुढीलप्रमाणे सांगतात – " चित्रकूटापासून सुतीक्ष्णाच्या आश्रमाला जाण्यास रामाला एक दिवस लागला. म्हणजे त्यांच्यामधील अंतर सुमारे १२ ते १८ मैल असावे; तेथून शरभंगाचा आश्रम एका दिवसाच्या प्रवासाच्या अंतरावर म्हणजे सुमारे १८ मैल दूर होता तेथून अगस्त्याच्या भावाचा आश्रम सहा योजनांवर म्हणजे २४ मैलांवर होता, तेथून अगस्त्याचा आश्रम ८ मैलांवर व त्यापुढे पंचवटी अर्ध्या दिवसाच्या प्रवासावर म्हणजे ८ मैलांवर होती नंतर ६ मैलांवर पंपा तलाव आणि जवळच किष्किंधा होती. तेव्हा चित्रकूट आणि किष्किंधा यामधील अंतर सुमारे २२ योजने किंवा ८८ ( किंवा फार तर १०० ) मैल होते हेच अंतर सर्व्हेच्या नकाशावरून चित्रकूटापासून पंपेचे ( रेवा संस्थानातील गोविंदगडजवळच्या तळ्याचे ) आणि किष्किन्धेचे ( रेवासंस्थानातील कंधोचे ) आहे. तेथून जवळच रावणाची लंका होती.[९]

वरील प्रमाणाचे परीक्षण

रामायणाच्या अरण्य आणि किष्किन्धाकांडातील रामादिकांच्या प्रवासाचे वर्णन अत्यंत त्रोटक आहे त्यात फारच थोड्या स्थलांचा नामनिर्देश आहे. उदाहरणार्थ अगस्त्याच्या आश्रमाला जाताना विन्ध्यपर्वत ओलांडण्याचा त्यात उल्लेख नाही. पण गोदावरीतीरावरच्या त्याच्या आश्रमाचा आहे. महाभारतात सांगितले आहे की विन्ध्यपर्वत उंच उंच होऊ लागल्यामुळे देवांच्या प्रार्थनेवरून अगस्त्य ऋषि दक्षिणेस जावयास निघाला. विन्ध्य त्याच्या पुढे नतमस्तक झाला. नंतर अगस्त्याने गोदावरीच्या तीरी आपला आश्रम स्थापला. पुढे तो दक्षिणेत दूरवर गेला. मलय पर्वतावरही अगस्त्याचा आश्रम होता. त्याचा निर्देश काही ग्रंथात आला आहे.[९] पण रामाच्या वनवासात त्याचा आश्रम गोदातीरी होता. उत्तर भारतात कोठेही अगस्त्याश्रमाचा उल्लेख नाही. तसेच गोदावरीचाही नाही. रा. ब. हीरालालनी गोदा नावाची एक लहान नदी चित्रकूट पर्वताच्या दक्षिण दिशेला ११ मैलावरून वहात असून ती पुढे सरस्वती नदीप्रमाणे एका विहीरीत ( ! ) अदृश्य होते असे म्हटले आहे.[१०] पण ही क्षुद्रनदी रामायणातील अगस्त्याश्रमाजवळची

९. उदाहरणार्थ उद्दंडीचे मल्लिकामारुत, अंक १० मधील कथा पहा,

१०. गंगानाथ झा व्हाल्यूम, पृ. १५७

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

गोदावरी असणे शक्य नाही. रामायणात विन्ध्य पर्वताप्रमाणे गोदावरीला अत्यंत महत्त्व आहे. ती अशी लहान नदी असणे शक्य नाही. शिवाय रामायणातील गोदानदी, श्री. किबे यांची अंतरगणना स्वीकारली तरी, चित्रकूटाच्या दक्षिणेस निदान २० योजनावर ( किबे यांच्या गणनेप्रमाणे ८० मैलावर ) वाहत होती ती १२ मैलावर वाहणाऱ्या पूर्वोक्त गोदानामक क्षुद्रप्रवाहाशी एकरूप होणे शक्य नाही.

शिवाय रामायणात सांगितलेली अंतरे वस्तुस्थितीला धरून नाहीत हे आम्ही इतरत्र दाखविले आहे.[११] उदाहरणार्थ, रामायणातील वर्णनाप्रमाणे प्रयाग येथील भरद्वाजाश्रमापासून चित्रकूटाचे अंतर दहा कोस किंवा वीस मैल होते. पण वस्तुस्थितीत हे अंतर ६५ मैल आहे. शिवाय पूर्वोक्त रामवनवासातील कांही स्थळांची ठिकाणे निश्चित नाहीत. त्यामुळे पंपा, किष्किंधा इत्यादि स्थळे रामायणांतील वर्णनावरून मध्यभारतात होती हे सिद्ध करता येत नाही.

रामायणाच्या किष्किन्धाकाण्डाचे संपादक मानकड यांचेहि मत लंका मध्यभारतात होती असे होते. पण त्यास या गोदावरी निर्देशाची अडचण येत होती. ती दूर करण्याकरिता त्यांनी निराळीच कल्पना लढविली. त्या कांडाच्या प्रस्तावनेत ते म्हणतात[१२] "किष्किन्धाकांडात गोदावरीचा उल्लेख अकरा ठिकाणी आला आहे. त्यांतील फक्त दोन ठिकाणे सोडून इतरत्र तिच्याबद्दल मन्दाकिनीसारखा दुसरा पाठ आहे. त्यावरून या सर्व ठिकाणी गोदावरीचे नाव मागाहून घालण्यात आले असावे." शुद्धपाठ ठरविण्याची ही रीत अजब आहे! शुद्धपाठ हस्तलिखितांच्या पुराव्यावरून ठरवावयाचा असतो, अज्ञातऱ्हेच्या अनुमानावरून नव्हे. शिवाय डॉ. पुसाळकरांनी दाखवून दिले आहे की किष्किंधाकांडात तेरा ठिकाणी आणि अरण्यकांडात चार ठिकाणी गोदावरीचा उल्लेख आला आहे. त्यापैकी बारा ठिकाणी गोदावरीबद्दल दुसरा पाठ नाही. फक्त पाच ठिकाणी तिच्याबद्दल 'मंदाकिनी' असा पाठ आढळतो.[१३] हस्तलिखितांच्या पुराव्यावरून या सर्व ठिकाणी 'गोदावरी' पाठच योग्य आहे आणि तोच चिकित्सक आवृत्तीत स्वीकारला आहे. केवळ निर्देशांच्या संख्याधिक्यावर पाठ ठरवावयाचे म्हटले तरी गोदावरी पाठच स्वीकार्य ठरेल.

---

११. मेघदूतातील रामगिरि अर्थात रामटेक, पृ. ७३ इत्यादि

१२. किष्किन्धाकाण्ड, प्रस्तावना, पृ. ५५.

१३. Journal of theOriental Institute, Vol. XV, p. 33 f.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

उत्तर भारतात गोदावरी नदी असल्याचा कोठेच उल्लेख नाही. दक्षिणेत तिच्या काठी अगस्त्याश्रम होता हे रामायणातच वर्णन आहे. अगस्त्याने विन्ध्य पर्वत ओलांडून तो स्थापला होता असे महाभारतात म्हटले आहे. तेव्हा लंका विन्ध्य पर्वताच्या उत्तरेस असणे शक्य नाही.

प्रमाण दुसरे

सीतेच्या शोधार्थ सांगितलेल्या मार्गात विन्ध्य पर्वताचे किष्किन्धेच्या दक्षिणेस अस्तित्व– सरदार किबे यांनी आपले लंकेच्या स्थानाविषयी संशोधन प्रथम मांडताना या प्रमाणाचा मुख्यत: निर्देश केला होता, " किष्किंधा-काण्डाच्या चाळीसाव्या अध्यायापुढील श्लोक या संदर्भात आले आहेत.

ततः प्रस्थाप्य सुग्रीवस्तन्महावानरं बलम् ।
दक्षिणां प्रेषयामास वानरानभिलक्षितान् ।। १ ।।

* * * *

सदस्रशिरसं विन्ध्यं नानाद्रुमलतावृतम् ।
नर्मदां च नदीं दुर्गां महोरगनिषेविताम् ।। ८ ।।
ततो गोदावरीं रम्यां कृष्णावेणीं महानदीम् ।
वरदां च महाभागां महोरगनिषेविताम् [१४] ।। ९ ।।

सुग्रीव किष्किन्धेत राज्य करीत होता. किष्किंधेच्या दक्षिणेस विन्ध्य, नर्मदा, गोदावरी, कृष्णा, वरदा (वर्धा) इत्यादि नद्या असल्यास ती किष्किन्धा उत्तर भारतात ( उदाहरणार्थ, रेवा संस्थानात ) असली पाहिजे हे उघड आहे. तेव्हा लंकाही उत्तर भारतातच असावी."

या प्रमाणाचे परीक्षण

डॉ. याकोबींनी हे श्लोक प्रक्षिप्त असावेत असे कळविल्यावरून श्री. किबे यांनी नंतरच्या लेखात या प्रमाणावर आपली भिस्त ठेवली नाही. आता रामायणाची चिकित्सित आवृत्ति प्रसिद्ध झाली आहे. तीत हे श्लोक प्रक्षिप्त मानले गेले नाहीत. तेव्हा याही प्रमाणाची छाननी केली पाहिजे.

सुग्रीवाने चारी दिशांत सीतेचा शोध करावा असे वानरांना आज्ञापिताच त्या त्या दिशांतील खालील देशांचा उल्लेख केला आहे[१५] —

( १ ) पूर्व– भागीरथी, सरयू, कौशिकी, कालिन्दी, सरस्वती, शोण इत्यादि नद्या; विदेह, मालव, काशिकोसल, मगध इत्यादि देश.

१४. किष्किन्धा ४०.१,८,९.
१५. पूर्वोक्त, सर्ग ३९ ते ४२ पहा.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

( २ ) दक्षिण– विन्ध्यपर्वत, नर्मदा, गोदावरी, कृष्णवेणी, वरदा या नद्या; मेखल, उत्कल, विदर्भ, ऋषिक, वङ्ग, कलिंग, कौशिक, आन्ध्र, चोल, पाण्ड्य, केरल देश, मलय पर्वत, महेन्द्र पर्वत इत्यादि.

( ३ ) पश्चिम– सुराष्ट्र, बाल्हीक, शूर, आभीर देश, सिन्धुसागर संगम, पश्चिम समुद्र इत्यादि.

( ४ ) उत्तर– हिमालय, भरतदेश, कुरु, मद्रक, काम्बोज, यवन, शक, आरट्टक, बाल्हीक, चीन हे देश आणि कैलास, क्रौञ्च पर्वत इत्यादि.

चारी दिशातील या पर्वत, नदी, देश इत्यादिकांचे निरीक्षण केल्यावर असे दिसून येईल की कवीने त्यांचा दिङ्निर्देश एकंदर भारताच्या दृष्टीने केला आहे. एका विशिष्ट ठिकाणाच्या संदर्भात नव्हे. तेव्हा ते पर्वत, नद्या व देश किष्किंधा नगरीच्या त्या त्या दिशास होते असे मानणे उचित होणार नाही. इतक्यानंतरही विन्ध्यपर्वत किष्किन्धेच्या दक्षिणेस होता असा कोणी आग्रह धरल्यास तन्नामक दुसरा पर्वत दक्षिण भारतात मलयपर्वताजवळ होता, हे सहज दाखविता येईल. भारतासारख्या खंडप्राय देशात एकाच नावाचे अनेक प्रदेश, नगरे व नद्या आढळल्यास आश्चर्य नाही. उदाहरणार्थ रामगिरि नावाचे अनेक पर्वत दक्षिण भारतातील भिन्न भिन्न प्रदेशात असलेले संशोधकांनी दाखविले आहेत; विदर्भ, मध्यप्रांताचा बस्तर जिल्हा, पूर्वीचे सिरगुजा संस्थान, ओरिसा वगैरे प्रदेशात रामगिरि नामक पर्वत आहेत. त्यातून कोणता पर्वत कालिदासाच्या मेघदूतात विवक्षित होता हे आम्हास मेघदूतात वर्णिलेल्या मेघमार्गावरून ठरवावे लागले.[१६] दुसरे उदाहरण प्रस्तुत वादातील किष्किंधानगरीचे. रामकथेशी संबद्ध अशा किष्किन्धेशिवाय आणखी एक तन्नामक नगरी राजस्थानात उदेपूरच्या दक्षिणेस सुमारे ४५ मैलावर कल्याणपुर नामक गाव आहे तेथे होती. तेथे अनेक प्राचीन अवशेष सापडले आहेत ते राजपुतान्यातील प्राचीन किष्किन्धा नगरीचे स्थान होय. राज्य करणारा महाराज भेत्ति याचा जवळच्या धुलेव गावी सापडलेला ताम्रपट सुमारे वीस वर्षापूर्वी आम्ही एपिग्राफिया इंडिकात संपादिला आहे.[१७] राजपुतान्यातील ही किष्किंधा नगरी आणि रामायणातील तन्नामक नगरी या एकच होत हे

१६. मेघदूतातील रामगिरि अर्थात रामटेक पृ. ३३ इ.

१७. व्हा. ३० पृ. १ इ. तसेच गोवा प्रदेशाला सिंहल किंवा लंका असे नाव होते हेहि आम्ही इतरत्र दाखविले आहे. संशोधनमुक्तावलि, सर ५ पृ. १८८.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कोणीही अद्यापि प्रतिपादिले नाही. तथापि या उदाहरणावरून केवळ नामसादृश्यावरून स्थानांचे ऐक्य मानण्यात काय धोका आहे हे ध्यानात येईल.

विंध्य पर्वत दक्षिणेतही होता हे पार्जिटरने पुष्कळ वर्षांपूर्वी दाखविले होते. रामायणाचा सूक्ष्म दृष्टीने अभ्यास केल्यावर हे स्पष्टपणे ध्यानात येते.

सुग्रीवाच्या आज्ञेप्रमाणे अनेक वानराना घेऊन हनूमान् दक्षिण दिशेस विंध्य पर्वताच्या गुहांत तपास करण्यास जाता झाला. दक्षिण दिशेचा उल्लेख करताना त्याने तिचा 'अगस्त्याचरितामाशाम्' असा उल्लेख केला आहे.[१८]

अगस्त्याचरितामाशां दक्षिणां यमरक्षिताम् ।
सहैभिर्वानरैर्मुख्यैरङ्गदप्रमुखैर्वयम् ॥

पुढे ते त्या पर्वताच्या एका मोठ्या गुहेत अडकून पडले तेव्हा रत्नप्रभा नामक तापसीने डोळे मिटावयास सांगून क्षणार्धात त्या गुहेबाहेर आणले आणि म्हटले –

एष विन्ध्यो गिरिः श्रीमान्नानाद्रुमलतायुतः ।
एष प्रस्रवणः शैलः सागरोऽयं महोदधिः ॥ (४, ५२, १२.)

तेव्हा हा विन्ध्य सागराच्या तीरावर होता असे स्पष्ट दिसते. 'महोदधिः' या पदावरून सागराचाच बोध होतो; किबे वगैरे समजतात त्याप्रमाणे एखाद्या मोठ्या तलावाचा नव्हे.

हा विन्ध्य पर्वत दक्षिणभारतात समुद्राच्या काठी होता याचे एक गमक किष्किधाकांडात आले आहे. वानर त्या पर्वतात हिंडत असता त्याना संपाति नामक गृध्र भेटला. त्याने "पूर्वी मी माझा धाकटा भाऊ जटायु याच्यासह सूर्यमंडळाकडे उड्डाण करीत असता सूर्याच्या तेजाने माझे पंख जळून गेले, पण आपल्या पंखांनी जटायूला आवरण घातल्यामुळे त्याचे पंख मात्र वाचले." असे सांगितले. त्यानंतर आपण विंध्य पर्वतावर आणि जटायु जनस्थानात कोसळला असे तो म्हणाला[१९] –

आशङ्के तं निपतितं जनस्थाने जटायुषम् ।
अहं तु पतितो विन्ध्ये दग्धपक्षो जडीकृतः ॥

– संपाति जेथे पडला तो विन्ध्यपर्वत कोठे होता याचे गमक याच कांडात इतरत्र आले आहे. संपातीने पुढे सांगितले की मी असा परस्वाधीन झालो असल्यामुळे

१८. किष्किन्धा, ५१.७.
१९. किष्किन्धा, ६०.१५.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

माझा मुलगा सुपार्श्व हा मला आहारादि देऊन माझे पोषण करीत असतो. एकदा त्याला येण्यास उशीर लागला. त्याचे कारण विचारल्यावर सुपार्श्व म्हणाला,[२०] मी मांसाच्या शोधार्थ महेंद्रपर्वतावर जाऊन तेथून सागराला जाणारा एकच मार्ग अडवून बसलो. नंतर मला एक काळाकभिन्न पुरुष एका सूर्यासारख्या उज्ज्वलप्रभेच्या स्त्रीला घेऊन जाताना दिसला. मी त्याला अडविले पण त्याने गयावया करून माझी प्रार्थना केल्यावर मी त्या दोघांना जाऊ दिले. पुढे ऋषीं-कडून मला कळले की तो रावण होता आणि तो आक्रोश करणाऱ्या रामपत्नी सीतेला घेऊन जात होता.

रामायणातील या वृत्तांतावरून पूर्वोक्त विन्ध्य महेंद्र पर्वताजवळच होता हे स्पष्ट आहे. महेन्द्र पर्वताचे स्थान दक्षिण भारतात होते हे कोरीव लेखां-वरून सिद्ध करता येते. उत्तर भारतात तो पर्वत असलेला कोठेहि उल्लेख नाही. म्हणून त्याच्या जवळचा विन्ध्य पर्वत हा दक्षिणसमुद्रतीरी होता, तो नर्मदेच्या उत्तरेस लागून असलेला विन्ध्य नव्हे हे स्पष्ट आहे.

डॉ. साकलिया यांना या महेंद्र पर्वताचा उल्लेख माहीत आहे. पण ते त्याला 'विन्ध्य पर्वताचीच एक लहानशी गिरिमालेच्या नावाने ओळखली जाणारी ओळ आणि पूर्वघाटाला दिलेले नाव असे मानतात.[२१] उद्या ते सह्या-द्रीला सुद्धा विन्ध्यपर्वताचा फाटा म्हणतील ! अशा रीतीने उत्तरेतील विन्ध्य-पर्वताचा दक्षिणसमुद्रानजीकच्या पर्वतराजीशी संबंध जोडणे अजब आहे !

## प्रमाण तिसरे

रावणवंशी यांचे सध्या मध्यभारतात अस्तित्व– "सध्या मध्यभारतात गोंड या आदिवासींच्या ( १ ) रावण ( २ ) वानर ( ३ ) रघु आणि ( ४ ) कोमर अशा चार जाती आहेत[२२] काही गोंड आपणास रावणवंशी राजगोंड म्हणवतात. त्यावरून त्यांचे त्या प्रदेशातील प्राचीन कालातील अस्तित्व सिद्ध होते. तेव्हा रावणाची लंका याच भागात– अमरकंटकजवळ– असावी" याप्रमाणाचे परीक्षण– सध्याच्या समजुतीवरून अशी अनुमाने काढू लागलो तर अनवस्था प्रसंग येईल. भारतीयेतिहासाच्या मध्ययुगीन कालात स्वतःच्या

२०. किष्किन्धा, ५८.१३ इ.

२१. वाल्मीकि रामायण ( एक पुरातत्त्वीय अध्ययन ), पृ. ५९.

२२. F. W. Thomas, Volume, p. 144.



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वंशाच्या प्राचीन विख्यात व्यक्तीशी किंवा वंशाशी संबंध जोडण्याची प्रथा पडून गेली होती. काही राजकुले स्वतःस सूर्यवंशी तर इतर काही चंद्रवंशी समजत. प्रतीहार राजे आपण लक्ष्मणाचे वंशज आहो असे दिमाखाने सांगत. छत्तीसगडातील राजे स्वतःला पांडववंशी म्हणवत. गुजरातेतील आद्य गुर्जर राजे कर्णास आपला पूर्वज मानीत. रेवा संस्थानातील काही राजे स्वतःला कौरववंशी समजत. गोंड हे आर्येतर वंशातील. तेव्हा त्यांनी आपल्या वंशाचा संबंध रावणाशी जोडला तर त्यात आश्चर्य नाही. पण जसे हे पूर्वोक्त मध्ययुगीन राजे त्या त्या वंशात किंवा त्या त्या विख्यात पौराणिक पुरुषापासून जन्मले असणे शक्य नाही तसेच गोंड लोकही रावणाच्या वंशात जन्मले होते हे संभवनीय नाही.

## प्रमाण चौथे

रामायणाचा वस्तुनिष्ठ दृष्टीने अभ्यास केल्यास लंका विन्ध्यपर्वतातच होती असे सिद्ध होते– " रामायणाच्या किष्किंधाकांडात संपातिपुत्र विंध्यपर्वतात असताना सुपार्श्वाने रावणाला आपल्या हाताने सीतेला उचलून घेऊन जाताना समक्ष पाहिले होते. तेव्हा रावण हा सामान्य प्रतीचा मानवच होता. हनुमंताने जो सागर पोहून पार केला तो शंभर योजना एवढा होता असे रामायणात वर्णिले आहे. सध्याचे सीलोन हीच लंका मानल्यास सीलोन व रामेश्वर यामधील अंतर शंभर योजने (४५० मैल) होईल. पण ते अंतर इतके नाही. तेव्हा योजन म्हणजे २०० गज मानले पाहिजे अशा प्रमाणाने हनुमान् १०० योजने पोहून गेला असणे शक्य आहे. ज्या ठिकाणी पाणी कमी असेल तेथे तो पायी चालत होता आणि ज्या ठिकाणी खडक वगैरे पाण्याच्यावर आलेले होते तेथे तो विश्रांति घेत होता. अशा रीतीने हे सरोवर ( सागर नव्हे ) त्याने पार केले असेल. याप्रमाणे या वर्णनाचा अर्थ केल्यास लंका मध्य प्रदेशात जबलपूरच्या उत्तरेस १८ मैलावर इंद्राणा पर्वतावर होती असे दाखविता येते. "

## परीक्षण

रामायण हे एक काव्य आहे त्यातील विधाने व वर्णने कल्पनाप्रचुर आहेत. ती वस्तुनिष्ठ दृष्टीने घेणे शक्य नाही. तशी ती घेतल्यास वस्तु-स्थितीशी जुळत नाहीत हे मागे प्रयागापासून चित्रकूट पर्वताच्या अंतराच्या रामायणातील विधानावरून आम्ही दाखविले आहे. म्हणूनच त्याकाव्यात रावणाचे दशमुखत्व, हनुमानाचे ४५० मैल पोहून जाणे, रामाचा लंकेपासून

अनुक्रमणिका

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अयोध्येपर्यंत बिभीषणादि राक्षस, वानर इत्यादिकांसह विमानातून प्रवास, युद्धात अनेक अस्त्रांचे प्रयोग इत्यादिकांचे वर्णन आढळते. ते वस्तुनिष्ठ दृष्टचा घेणे योग्य नाही, आणि तसे सर्वत्र शक्यही होणार नाही. उदाहरणार्थ रावण सीतेला घेऊन पायीच चालत होता असे नाही. तो आकाशमार्गानेही जात होता. म्हणूनच सीतेला आपले अलंकार ऋष्यमूक पर्वतावर बसलेल्या वानरांकडे टाकता आले. तेव्हा तो केवळ मानव नव्हता.

शिवाय ज्या पर्वतात सुपार्श्वाला रावण सीतेला घेऊन जाताना भेटला तो पर्वत विन्ध्य नसून महेन्द्र होता. तो दक्षिण भारतातील हे मागे दाखविले आहे. त्याच्याजवळचा विंध्य भारताच्या मध्यभागातील विन्ध्य पर्वताहून निराळा, भारताच्या दक्षिणटोकाजवळचा होता हे मागे दाखविले आहे. तेव्हा या दुसऱ्या विंध्य पर्वताच्या दक्षिणेची लंका ही मध्यभारतात असणे शक्य नाही.

## इतर किरकोळ प्रमाणे

याशिवाय डॉ. सांकलियानी लंका विंध्य प्रदेशात होती हे सिद्ध करण्यास अनेक किरकोळ प्रमाणे दिली आहेत. त्यांचाहि थोडक्यात विचार करू. ती ही–( १ ) रामाने सात साल वृक्षांचा वेध आपल्या बाणानी केला. लंकेच्या युद्धात राक्षस व वानर यांनी सालवृक्ष उपटून एकमेकांवर फेकले असे वर्णन आहे. हल्ली सालवृक्षांची वने मध्य प्रदेशातील पूर्वभागात अमरकंटकाचे पठारावर तसेच छोटा नागपूर इत्यादि भागात आढळतात. ( २ ) लंका हा शब्द मुण्डारी भाषेतील आहे. (३) रावण हा गोंडजातीचा होता.

## या प्रमाणांचे परीक्षण

प्रमाणे पोचट आहेत, ( १ ) सध्या सालवृक्षांची वने दक्षिणेत दिसत नसली तरी पूर्वी ते वृक्ष दक्षिणेत होत नसत असे म्हणणे सयुक्तिक होणार नाही. याच्या उलट असे म्हणता येईल की रामायणातील सागराचे वर्णन मध्यप्रदेशातील कोणत्याही विशाल तळ्याला लागू पडणार नाही. त्याला लवणाम्भस् ( खाऱ्या पाण्याचा ) असे म्हटले आहे.[२३] तसेच चंद्रोदयाच्या वेळी त्याला भरती आली होती, आणि त्यात मोठमोठे पर्वत, मगर, नाग इत्यादि जलचर

२३. रामायण, किष्किंधाकाण्ड, ५७.३१. युद्धकाण्ड ४.१११ मध्ये चंद्रोदयामुळे सागराला भरती आल्याचे वर्णिले आहे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

होते इत्यादि वर्णन आहे.[२४] हे वर्णन कोणत्याही तलावाला लागू पडणारे नाही. रामायणातील साल वृक्षांचे उल्लेख लक्षात घ्यावयाचे तर हे वर्णनही का यथार्थ मानू नये ? तसे न केल्यास 'अर्धजरतीय न्यायाचा दोष' प्राप्त होईल.

(२) लंका शब्द आर्येतर भाषेतून घेतला असेल. लंकेतील मूळची वसती आर्येतराची असेल. पण त्यावरून रामायण कथा असत्य होत नाही.

(३) रावण शब्द संस्कृतमध्येही व्युत्पादिता येतो. 'शिवादिभ्योऽण् ।' या पाणिनिसूत्राच्या गणपाठात अण् प्रत्ययापूर्वी 'विश्रवस्' शब्दाला 'विश्रवण' आणि 'रवण' असे आदेश होतात, हे सांगितले आहे. तो प्रत्यय लागल्यावर वैश्रवण (कुबेर) आणि रावण अशी रूपे होतात, गणपाठात या शब्दांचा उपयोग केला असल्यामुळे 'रावण' शब्दाची ही व्युत्पत्ति निदान ख्रिस्तपूर्व सहाव्या शतकाइतकी प्राचीन आहे.[२४]

राम, हनूमान, रावण हे वस्तुतः मानव असले तरी अतिमानव शक्ति-संपन्न असेच कवीला विवक्षित होते आणि त्याच श्रद्धेने त्याने त्यांची चरित्रे वर्णिली आहेत. त्या वर्णनातून आपणास उपयोगी तेवढाच भाग घेऊन रामचरित्राची उपपत्ति लावणे योग्य नव्हे.

जे व्यक्तींच्या बाबतीत तेच नगररचना, अन्नपानादि व्यवहार यांच्या बाबतीत खरे आहे. ही वर्णने काल्पनिक आणि अतिशयोक्तिपूर्ण आहेत. कल्पनारम्य आणि अतिशयोक्त वर्णन करणे हा संस्कृत कवींचा स्वभावच आहे. एवढा मोठा कालिदास ऐतिहासिक कालात ख्रिस्तोत्तर ४०० च्या सुमारास झालेला. पण तोही दशरथराजाने दहा हजार वर्षे राज्य केले असे रघुवंशात वर्णन करतो. रघुवंश (सर्ग १०, श्लो. १) मधील खालील श्लोक पाहा–

पृथिवीं शासतस्य पाकशासनतेजसः
किञ्चिदूनमनूनर्द्धेः शरदामयुतं ययौ ॥

तेव्हा रामायणात काही नगरांच्या वर्णनात 'प्रशस्त आणि सरळ राजमार्ग आणि एकमेकांना समांतर असलेल्या सडका' यांचे वर्णन आलेले पाहून त्या काव्याचा तो भाग इंडोग्रीक संस्कृति वायव्य प्रदेशात प्रस्थापित झाली त्या कालानंतरचा असावा असे अनुमान करणे सयुक्तिक होणार नाही. तसेच रामायणाच्या अयोध्याकांडात भरद्वाजाश्रमामध्ये भरताच्या सैनिकांचे जे मांस, मदिरा आणि मदिराक्षी यांच्या वैपुल्याने स्वागत झाले

२४. पाणिनीचा काल ख्रिस्तपूर्व सहावे शतक धरण्यात येतो.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ते भारतात रोमन मद्याचे विपुल कुंभ, येऊ लागल्यानंतरचे असावे हे अनुमानहि तसेच तर्कदुष्ट आहे. भारतात मदिरेचा उपयोग आपला रोमनसाम्राज्याशी व्यापार सुरू झाल्यानंतरचा नाही. ऋग्वेदातील १०.३४ या सूक्तात एक दारुड्या आपली निकृष्टावस्था सुरादिकांच्या आसक्तिमुळे झाली असे पश्चात्तापपूर्वक कबूल करीत आहे. तेव्हा भरद्वाजाश्रमातील सैनिकांच्या स्वागताचे वर्णन कवीला आपल्या कल्पनाशक्तीने करता आले नसते असे नाही, त्याकरिता रोमन मद्याचे पाट भारतात वाहले असणे आवश्यक नाही.

डॉ. सांकलिया रामायणाचे कमीतकमी चार भाग करतात. त्यातील सर्वात प्राचीन भाग ई० पूर्व सहाव्या किंवा सातव्या शतकातील आणि शेवटचा भाग ई. सनाच्या ५ व्या किंवा ६ व्या शतकातील असावा असे ते मानतात रामायणातील काही भाग पाचव्या सहाव्या शतकाइतका प्राचीन आहे यात संशय नाही. पतंजलीच्या महाभाष्यात 'याति जीवन्तमानन्दो नरं वर्षशतादपि ॥' हा सुंदर कांडातील सुप्रसिद्ध श्लोकार्ध उद्धृत केला, आहे.[२५] त्या आदिकाव्याचा काही भाग खिस्तोत्तर पहिल्या दुसऱ्या शतकानंतरचा आहे हे ठरवण्यास पुरातत्त्वाच्या पुराव्याची जरूरी नाही. त्या काव्यात शक, बाल्हीक वगैरे परदेशी आक्रमकांच्या देशांचा उल्लेख आहे त्यावरूनच ते सिद्ध होते. पण वाल्मीकिरामायणाला खिस्तोत्तर तिसऱ्या शतकापूर्वीच सध्याचे रूप प्राप्त झाले होते यात संशय नाही. भास ( खिस्तोत्तर तिसरे शतक ) व कालिदास (खिस्तोत्तर चौथे-पाचवे शतक) यांनी आपल्या ग्रंथात जी रामकथा दिली आहे ती उत्तरकांडासहित रामायणातल्यासारखी आहे. त्यानंतर काही ठिकाणी काही भाग घुसडले गेले असतील. पण मूळ कथेत फरक झाला नाही. रामायणसंबद्ध शिल्पे गुप्त कालापूर्वी सापडत नाहीत हे खरे, पण त्यावरून त्या कालापूर्वी ते काव्य प्रचारात नव्हते असे म्हणता येणार नाही.

रामकथेचे मूळचे रूप कसे होते हे आपणास आज शेकडो वर्षानंतर सांगणे शक्य नाही. या बाबतीत पुरातत्त्वशास्त्राचा काही उपयोग होणार नाही. कारण रामायणनिर्मितिकालीन वस्तु उत्खननाने सापडल्या नाहीत आणि सापडण्याची शक्यता नाही. रामायण हे आदिकाव्य गणले जाते, ते इतिहास नव्हे. त्यातील वर्णन एका महान् कवीने आपल्या प्रभावी कल्पनाशक्तीने केले आहे, त्यात उत्तर भारतातल्या प्रमाणे दक्षिण भारतातील देश, पर्वत, नद्या

२५. सुन्दरकांड, ३४.६ कल्याणी बतगाथेयं लौकिकी प्रतिभाति मे। एति जीवन्तमानन्दो नरं वर्षशतादपि ॥


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

इत्यादिकांचे उल्लेख आहेत. ख्रिस्तपूर्व पाचव्या सहाव्या शतकात हे देश वगैरे अज्ञात होते असे म्हणता येत नाही. कारण वेदवाङ्मयातही त्यातील आन्ध्र, विदर्भादि काही देशांचा उल्लेख येतो. तेव्हा रामायणाचा आरंभ-काल ख्रिस्तपूर्व पाचव्या सहाव्या शतकापूर्वीही जाऊ शकेल.

रामायणात अयस् किंवा लोखंड, यापासून बनविलेल्या वस्तूंचा— उदाहरणार्थ, शस्त्रे, धनुष्याकरिता आठ चाकांची पेटी वगैरेचा उल्लेख आढळतो म्हणून त्याचा काळ ख्रिस्तपूर्व ४०० ते ५०० पासून ईसवीसनाच्यानंतर ३०० ते ४०० शतकाच्या दरम्यान असला पाहिजे असे डॉ. सांकलियानी म्हटले आहे. पण 'अयस्'चा उपयोग ऋग्वेदकाळीही होत होता. ऋग्वेदाच्या १. ११६. १५ या ऋचेत म्हटले आहे की, लढाईत विश्पलेचा पाय तोडला गेला तेव्हा अश्विनीकुमारांनी तिला लोखंडाचा पाय ( जंघामायसीम् ) बसवला. येथे काही विद्वान् 'आयसी' याचा अर्थ 'तांब्याची' असा घेतात. पण ते बरोबर नाही. त्या शब्दांचा अर्थ लोखंडाचा पाय असाच सर्व प्राचीन व अर्वाचीन टीकाकारांनी केला आहे. अशा कामाकरिता लोखंडाचा उपयोग होत असल्यास ती धातु धनुष्याची गाडी, शस्त्रास्त्रे वगैरेकरिता उपयोगात आणली जात नसेल हे संभवनीय नाही.

वरील प्रमाणपरीक्षणावरून वाल्मिकी रामायणात वर्णिलेली लंका मध्य भारतात होती आणि त्यातील वर्णनावरून त्याचा काही भाग आमचा रोमन साम्राज्याशी संबंध आल्यावर रचला गेला हे सिद्ध होत नाही हे वाचकांच्या लक्षात येईल.

◆ ◆ ◆

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत

नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. रंगनाथ कौलगुड

# माणसाच्या मेंदूची असमरूपता

बहुतेक प्राण्यांची मज्जातंतूंच्या व्यवस्थेची रचना समरूप असते. सस्तन प्राण्यांत तर ही समरूपता अधिक ठळकपणे दिसते. कारण त्यांच्या मेंदूच्या वरच्या भागावर दोन अर्धगोलाकार टेंगुळे असतात. माणसाच्या मेंदूची रचना याच धर्तीची असते. परंतु अलीकडील संशोधनात असे आढळून आले आहे की माणसाच्या मेंदूचे अर्धगोल रचनेत समरूप असले, तरी त्यांच्या कार्यात असमरूपता ( Asymmet ) असते. उदाहरणार्थ, बोलण्याच्या क्रियेचे नियंत्रण मुख्यतः डाव्या गोलार्धाकडे असते, तर परिसराविषयी ज्ञान मिळविण्याच्या बाबतीत उजव्या गोलार्धाचा पुढाकार असतो. याचा अर्थ असा की मेंदूची कामगिरी दोन्ही अर्धगोलांना सारखी वाटून दिलेली नाही प्रत्येक गोलार्धाकडे काही खास बाबी दिलेल्या आहेत. या कार्यविभागणीलाच मेंदूची असमरूपता म्हणतात.

गेल्या शंभर वर्षांत मेंदूतील गोलार्धांच्या कार्याविषयी बरीच उपयुक्त माहिती प्राप्त झालेली आहे. त्यासाठी केवळ अशा व्यक्तींची निवड केली जात होती की ज्यांच्या मेंदूला रोगामुळे, जखमेमुळे किंवा शल्यक्रियेमुळे अपाय झालेला आहे. अशा तऱ्हेने मिळविलेले ज्ञान महत्वाचे असले तरी त्यात एक प्रमुख दोष आहे. तो म्हणजे प्रायोगिक व्यक्तीच्या मेंदूचा एकच एक भाग बिघडलेला असण्याचा संभव कमी असतो. त्याच बरोबर मेंदूच्या निरनिराळ्या भागांमधील परस्पर प्रक्रिया ही बिघडलेल्या असण्याचा संभव असतो. म्हणून या प्रयोगांचे फलितांश तपासण्याचे काम जिकिरीचे होते. कारण त्यासाठी वर सांगितलेल्या सर्व संभवनीय गोष्टींची दखल घेणे जरूरीचे असते.

अगदी अलीकडे डोरीन किम्युरा या संशोधकाने शाबूत मेंदूवाल्या व्यक्तींच्यावर प्रयोग करण्याचे धाडस दाखविले आहे व त्यामुळे मेंदूसंबंधीच्या संशोधनाचे पाऊल बरेच पुढे पडण्यास मदत झालेली आहे.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपल्या एका प्रयोगात किम्युराने काही व्यक्ती अशा निवडल्या होत्या की ज्यांच्या दोन्ही कानांची ध्वनी ओळखण्याची क्षमता सारखी आहे. या व्यक्तींपैकी काहींच्या मेंदूला उजव्या भागाला इजा झाली होती तर इतरांच्या मेंदूला डाव्या भागाला इजा झाली होती. प्रयोगामध्ये प्रत्येक व्यक्तीच्या दोन्ही कानांत एकाचवेळी वेगवेगळे अंक एकामागून एक असे सांगण्यात आले. नंतर प्रत्येकाला ऐकलेले अंक लिहून दाखविण्यास सांगितले. त्यावरून असे दिसून आले की उजव्या भागाला इजा झालेल्या व्यक्तींच्या ऐकण्याच्या बाबतीत जास्त चुका झाल्या.

वरील प्रयोगातून एक आश्चर्यकारक निष्कर्ष निघतो तो म्हणजे : इजा उजव्या किंवा डाव्या भागाला झाली असली तरी ऐकू येण्याच्या बाबतीत उजवा कान हा डाव्या कानापेक्षा 'उजवा' असतो. किम्युराने हाच प्रयोग सामान्य मेंदूवाल्या व्यक्तींवर केल्यावरही निष्कर्ष तोच निघाला. यावरून श्रवणक्रियेत उजव्या कानाची श्रेष्ठता सिद्ध होते. दोन्ही कानांच्या कार्यक्षमतेत असा फरक पडण्याचे कारण कदाचित असे असू शकेल की दोन्ही कान ज्या पद्धतीनी मेंदूशी जोडलेले असतात, त्या पद्धती भिन्न असाव्यात.

माणसाच्या मज्जातंतू व्यवस्थेचा अभ्यास केल्यास एक मौज दिसते. म्हणजे शरीराच्या एका बाजूचे नियंत्रण मेंदूच्या विरुद्ध बाजूच्या गोलार्धाकडून केले जाते. उदाहरणार्थ, पाहण्याची क्रिया घ्या. पाहिल्या जाणाऱ्या वस्तूची उजवी बाजू डाव्या गोलार्धाशी तर डावी बाजू उजव्या गोलार्धाशी संबंध राखते. याचा अर्थ असा की दृष्टीची संवेदना देणारे मार्ग एकमेकास ओलांडून जातात.

ऐकण्याच्या क्रियेतही ध्वनिसंवेदनाचे मार्ग एकमेकास ओलांडून जातात. याशिवाय सरळ मार्गही असतात. याचा अर्थ असा की कोणत्याही एका कानाने ऐकलेल्या ध्वनीच्या संवेदना दोन्ही अर्धगोलांतर्फे हाताळल्या जातात. परंतु काही झाले तरी ओलांडणाऱ्या संवेदना सरळमार्गी संवेदनांपेक्षा नेहमीच जास्त प्रबळ असतात. सारांश, श्रवणसंवेदनांचे मार्ग बव्हंशी ओलांडून जाणाऱ्या प्रकारात मोडतात. म्हणून उजव्या कानाने ऐकलेले शब्द मेंदूकडून जास्त सुलभपणे ग्रहण केले जातात.

वरील तर्काला प्रायोगिक समर्थन आहे. काही थोड्या व्यक्तींचे वाचाकेंद्र डाव्या गोलार्धाऐवजी त्यांच्या उजव्या गोलार्धात असते. हे सिद्ध करण्यासाठी



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रायोगिक व्यक्तीला मानेच्या एका बाजूतील अपधमनीत सोडिअम अम्यूटलचे इंजेक्शन देण्यात येते. त्यामुळे त्या व्यक्तीच्या मेंदूचा त्या बाजूचा गोलार्ध काही मिनिटे काम देत नाही. या मुदतीत त्या व्यक्तीची वाचापरीक्षा घेण्यात येते. त्यावेळी बोलण्यात बिघाड झाल्याचे आढळून आले तर त्या व्यक्तीचे वाचाकेंद्र ज्या बाजूला इंजेक्शन दिलेले होते त्या बाजूला आहे असे ठरविता येते.

डोरीन किम्युराच्या वाटचाला उजव्या वाचाकेंद्राचे एकूण १३ इसम मिळाले. त्यांच्यावर प्रयोग केल्यानंतर असे दिसून आले की त्यांचे डावे कान ऐकण्याची क्रिया अधिक चांगली करू शकतात. यावरून सामान्य व्यक्तीच्या उजव्या कानाला जी अधिक श्रवणक्षमता लाभलेली असते त्याचे कारण त्या कानाचे डाव्या गोलार्धाशी म्हणजे वाचाकेंद्राशी अधिक चांगले संबंध असतात हे स्पष्ट होते.

दोन्ही अर्धगोलांच्या श्रवणकार्यात आणखीही सूक्ष्म भेद आहेत. या संबंधी ब्रेन्डा मिलनर हिने एक प्रयोग केला. त्यात तिला असे आढळले की प्रायोगिक व्यक्तीच्या मेंदूला डाव्या बाजूला इजा असल्यास तिला वाचून दाखविलेला मजकूर समजून घेण्यास त्रास होतो. उलट इजा उजव्या बाजूला असल्यास तिला स्वरांतील व स्वर-रचनांतील फरक ओळखताना कष्ट पडतात.

मिलनरने सामान्य मेंदूच्या व्यक्तीला एका मागून एक अशा चार छोट्या स्वररचना ऐकविण्यात आल्या. त्यावेळी डाव्या कानाने ऐकलेल्या स्वररचना तिच्या अधिक चांगल्या लक्षात राहिल्या. यावरून लयीची समज मुख्यतः उजव्या गोलार्धाकडून होते, हे स्पष्ट होते.

वरील विवेचनावरून असे दिसते की सामान्य व्यक्तीच्या मेंदूतील डावा गोलार्ध हे वाचाकेंद्र असते तर उजवा गोलार्ध लय-केंद्र असते. यावरून भाषा व संगीत यातील भेद स्पष्ट होतो. भाषेमध्ये अर्थवाहक ध्वनी असतात. तर संगीतामध्ये ध्वनी अर्थवहनापेक्षा लयबद्धतेकडे जास्त लक्ष पुरविताना आढळतात. सारांश, मेंदूच्या कार्याची विभागणी काही तत्त्वावर आधारलेली आहे असे अनुमान काढता येते. त्यात स्वैर निवडीचा प्रकार दिसत नाही.

माणूस बोलतो त्यावेळी जे ध्वनी निर्माण होतात ते ध्वनी त्याने पूर्वी कधीतरी ऐकलेले असतात. वाचलेला प्रत्येक शब्द पूर्वी कधीतरी उच्चारलेला असतो. याचा अर्थ असा की वाचा म्हणजे अशी एक संयुक्त व्यवस्था आहे की ज्यामध्ये पाहणे व ऐकणे या दोन्ही क्रियांचा अंतर्भाव असतो. माणूस बोलताना डोके स्थिर ठेवू शकतो. त्यामुळे कान स्थिर रहातात. परंतु डोळे

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

स्थिर राहू शकत नाहीत. या कारणामुळेही श्रवण व दृष्टी या दोन क्रियात भिन्नता निर्माण होऊ शकते. यासंबंधी जे प्रयोग केले गेले त्यात असे आढळून आले आहे की सामान्य व्यक्तीला वस्तूच्या उजव्या दृष्यभागातील अक्षरे व शब्द अधिक चांगल्या रीतीने वाचता येतात. यावरून पाहण्याच्या क्रियेसाठी मेंदूचा डावा भाग उत्तेजित व्हावा लागतो हे स्पष्ट होते. यावरून उजव्या कानाच्या अधिक क्षमतेचे आपोआप समर्थन होते.

ज्या व्यक्तीच्या मेंदूला पाठीमागच्या उजव्या भागाला इजा झालेली असते तिला काही गुंतागुंतीची कामे करण्यासाठी त्रास पडतो ही गोष्ट संशोधकांना बरीच वर्षे माहीत आहे. अशा व्यक्तींना चित्रकला, जागा हुडकून काढणे, चित्रावरून किंवा आराखड्यावरून नमुना बनविणे वगैरे क्रिया जमत नाहीत.

अलीकडील संशोधनात असे आढळले आहे की, एखाद्या मोकळ्या जागेतील एखादा विवक्षित बिंदू शोधून काढण्यासाठी उजव्या गोलार्धाचाच जास्त उपयोग होतो. याच गोलार्धामुळे खोलपणा कळतो. द्विचक्षूदर्शनाने देखील वस्तूच्या खोलीचे ज्ञान होते. परंतु त्याचे तत्त्व वेगळे आहे. सारांश. परिसराविषयी ज्ञान मिळविण्याच्या कामी आपल्याला आपल्या मेंदूचा उजवा भाग जास्त उपयोगी पडतो.

माणूस जेव्हा बोलायला लागतो त्यावेळी त्याच्या हातांच्या हालचाली होतात. लक्षपूर्वक पाहिल्यास आपल्याला असे आढळून येईल की, उजव्या हाताच्या हालचाली डाव्या हाताच्या हालचालीपेक्षा अधिक असतात. येथे तो माणूस उजवा आहे की डावरा आहे हा प्रश्न नसतो. खरे कारण म्हणजे बोलण्याच्या क्रियेचे केंद्र माणसाच्या मेंदूच्या डाव्या गोलार्धात असते. हा गोलार्धच त्याच्या उजव्या हातावर नियंत्रण ठेवीत असतो. यावरून बोलताना उजव्या हाताच्या अनुरूप हालचाली जास्त प्रमाणात का होतात हे समजून घेता येते.

लिंगभेदामुळे देखील मेंदूच्या कार्यात असमरूपता येऊ शकते. पुरुषांच्या उजव्या गोलार्धाचे कार्य स्त्रियांच्या उजव्या गोलार्धाच्या कार्यापेक्षा जास्त वैशिष्टचपूर्ण असते. डाव्या गोलार्धाच्या कार्याच्या बाबतीत स्त्रीचा मेंदू वरचढ असतो. यावरून स्त्री व पुरुष यांच्या मेंदूंची उत्क्रांती किंचित वेगळ्या पद्धतीनी झाली आहे असे अनुमान काढता येते. हे अनुमान बरोबर आहे हे सहज पटण्यासारखे आहे. कारण मानवी उत्क्रांतीच्या सुरुवातीला पुरुष शिकारीवृत्तीचा होता. त्यामुळे त्याला जवळच्या व दूरच्या परिसराचे बारीक निरीक्षण करणे भाग होते. स्त्री बिचारी गुहेतच रहावयाची त्यामुळे तिला अशा निरीक्षणाची



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

गरज नव्हती. परिणामी स्त्री व पुरुष यांच्या मेंदूतील कार्यामध्ये काही खास भेद निर्माण झाले. तात्पर्य, मेंदूची असमरूपता सार्वत्रिक असली तरी स्त्री व पुरुष यांच्या बाबतीतील असमरूपतेची जात किंचित वेगळी आहे.

आतापर्यंत जे विवेचन झाले त्यावरून सामान्य व्यक्तीच्या मेंदूचे दोन गोलार्ध त्यांच्या कार्याच्या बाबतीत सारखेपणा राखत नाहीत हे स्पष्ट झालेले आहे. उजवा व डावा ही शब्दांची जोडी शब्दार्थाने समरुप आहे. याचा अर्थ असा की उजव्याला उजवे म्हणणे हा एक केवळ योगायोग आहे, अपघात आहे. परंतु जेव्हा हे शब्द माणसाच्या शरीराच्या निरनिराळ्या अवयवांना लावण्यात येतात त्यावेळी त्यांच्यातील समरूपता नाहीशी झालेली असते हे आपण लक्षात ठेवले पाहिजे.

निदान यापुढे तरी कोणी तुम्हाला एखादी महत्त्वाची गुप्त बातमी सांगायला आला, तर त्यासाठी तुम्ही आपला उजवाच कान पुढे करा. चुकून डावा पुढे कराल तर कदाचित तुम्हाला नीट ऐकू न आल्यामुळे पस्तावावे लागेल.






अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. दि. मा. खैरकर

# व्यासप्रणीत कर्मांचे समाजशास्त्र : १ :

भारतीय संस्कृती वेद व उपनिषदे याच्या पायावर आधारलेली संस्कृती आहे. तिचा उगम वेदकाळी झाला. व्यासानी व मनुप्रभृती स्मृतिकारानी तिला निश्चित असा आकार दिला. तेव्हापासून आतापर्यंत भारतीय संस्कृतीत बरेच फेरफार झाले; व सध्या पाश्चात्य संस्कृतीच्या संपर्कामुळे तिच्यात आणखी जास्त फेरफार होण्याचे घाटत आहे. असे जरी असले तरी भारतीय संस्कृती धर्मप्रधान आहे. ती सर्वमान्य तत्वावर आधारलेली आहे. हजारो वर्षांच्या परंपरांमुळे या तत्वास मान्यता प्राप्त झाली आहे. सांप्रतच्या काळी या तत्वाचे मूल्यमापन होणे आवश्यक आहे.

या संस्कृतीस निश्चित आकार देण्यात महर्षी व्यास यांचा फार मोठा वाटा आहे. कारण प्राचीन भारतात माणसाने सामाजिक कर्मे कोणती करावी व ती कशी करावी याकडे इतर कोणत्याही व्यक्तीपेक्षा वेदव्यास यानीच सर्वात जास्त लक्ष पुरविले. त्यांची शिकवणूक भक्तिप्रधान कर्मयोगाची आहे. हा कर्मयोग समाजरचनेचा पाया कशा प्रकारचा असावा याचे दिग्दर्शन करतो. कर्तव्याचे महत्व विषद करतो. यापूर्वीच्या वेदादि ग्रंथात मुख्यत्वेकरून कर्मकांडाची शिकवण आली होती, व जनतेला सामाजिक कर्तव्याच्या बाबतीत निश्चित असे मार्गदर्शन प्राप्त झाले नव्हते. व्यासाच्या काळी समाजात वर्णव्यवस्था रूढ होऊ लागली होती. वेदव्यासानी तिला तत्वज्ञानाची बैठक दिली व तिचा पाया खंबीर केला. इतकेच नाही तर ते तत्वज्ञान चिरंतन टिकणारे आहे असा समज दृढ होईल अशी योजना केली. त्यामुळे त्याची शिकवण कायम राहिली. सध्याच्या काळी चातुर्वर्ण्यसंस्था नष्ट झाली असली तरी व्यासाच्या कल्पनांचा पगडा लोकावर अजूनही आहे.

व्यासांचा निश्चितकाल आपणांस माहित नाही. त्यांच्या एकंदर लिखाणावरून तो इ. स.पूर्व एक हजार वर्षापूर्वीचा काळ असावा. त्याकाळी समाजाची चार वर्णात विभागणी होण्यास सुरवात झाली होती असे दिसते. ही विभागणी फार





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

काटेकोर नव्हती; ब्राह्मण क्षत्रियाचे काम करीत व क्षत्रिय ब्राह्मणाचे काम करीत. समाजात कर्ममार्ग व सन्यासमार्ग या दोन्हीसही मान्यता प्राप्त झाली होती. ह्या दोन्ही निष्ठा मोक्षप्रद आहेत असा समज होता. त्याकाळी ब्राह्मण तसेच क्षत्रिय सन्यास घेत असत. व्यासास सन्यासमार्ग पसंत नव्हता, व समाजास कर्म-मार्गाकडे प्रवृत्त करण्याची तळमळ लागली होती. या तळमळीतूनच त्यांची सर्व ग्रंथसंपदा निर्माण झाली. लोकांना कर्ममार्गाकडे वळविण्यासाठी त्यांनी आपले सर्व आयुष्य खर्च केले. आपले विचार सामान्यापर्यंत पोचविण्यासाठी महाभारत लिहिले. त्याचप्रमाणे पुराण ग्रंथाचे संपादन केले. व लोकांना भक्तीपर बनविण्या-साठी भागवत पुराणाची रचना केली. त्याचे सर्व कार्य भारतीय संस्कृतीच्या प्रवाहास कलाटणी देणारे ठरले. त्यांच्या शिकवणुकीचा भारतीय जनतेवर अजूनही पगडा बसला आहे. भारतीय जनता त्याचा प्रत्येक शब्द खरा आहे असे समजून त्याचा अन्वयार्थ लावण्याचा प्रयत्न करते यावरून हे स्पष्ट होते.

व्यासाच्या प्रचंड उद्योगावरून व्यास केवळ संशोधक नव्हते असे दिसते. त्याचे कार्य एखाद्या इंजिनिअरप्रमाणे होते. संशोधक केवळ नवीन संशोधन कर-ण्यात मग्न असतो तर इंजिनिअर संशोधकाने जे संशोधन केलेले असेल त्याचा व्यवहारात कसा उपयोग करता येईल या गोष्टीकडे लक्ष पुरवतो, व्यासास वेद सांख्य व उपनिषदे याचे सूक्ष्म ज्ञान होते. त्याचप्रमाणे त्यास लोकांच्या रुढी व परंपरा याचे ज्ञान असून लोकांना वळण लावण्यास लागणारे अचाट बुद्धिसामर्थ्यही त्यांच्या अंगी होते. त्यानी आपल्या या सर्व शक्तींचा उपयोग समाजपरिवर्तनासाठी केला. व्यासांनी सुरवातीस भारतीय युद्धाचे वर्णन करणारा जय ग्रंथ लिहिला व नंतरच्या काळात या ग्रंथात त्यांच्या शिष्यानी बरेच फेरफार केले. ह्यासंबंधी जे संशोधन उपलब्ध आहे त्यात व्यासानंतर त्यांचा शिष्य वैशंपायन यांनी व्यासाच्या ग्रंथात बदल केले असे दिसते व वैशंपायनाचा भारतग्रंथ २४००० हजार श्लोकाचा असावा. त्यानंतरच्या काळात इ. स. पूर्व सुमारे २५० वर्षापूर्वी लोमहर्षण नावाच्या महापंडिताने या ग्रंथात फारच मोठे बदल केले व त्यास महाभारत हे नांव दिले गेले. सौतीने बदल केल्यानंतर या ग्रंथाची श्लोकसंख्या जवळ जवळ दश लक्ष एवढी झाली.

## व्यासांचे कर्मसिद्धान्त

प्रस्तुत लेखमालेत आम्ही मुख्यत: व्यासांच्या कर्मासंबंधीच्या कल्पनांची चर्चा करणार आहो. व्यासाचे लिखाण विपुल आहे व कर्माखेरीज इतर विषया-वरही त्यानी बरेच लिहिलेले आहे. पण या इतर मुद्यांचा येथे विचार कराव-



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

याचा नाही. त्या मुद्यांचा जर कर्माशी संबंध येत असेल तरच त्याचा विचार येथे केला जाईल. व्यासांची कर्मासंबंधाची मते आपणास गीता व महाभारत यांच्यापासून मिळू शकतात.

व्यासानी कर्मासंबंधाने पुढील सिद्धांत मांडले आहेत असे आपणांस दिसून येते :

१) कर्मसातत्याचा सिद्धांत

प्रत्येक माणसाने त्याच्या स्वधर्मानुसार म्हणजे गुणानुसार कोणते काम करावे हे शास्त्राने निश्चित केलेले आहे. प्रत्येक माणसाने हे नियतकर्म सतत करीत जावे. नियतकर्म निश्चयपूर्वक करीत गेले असता माणसातील सुखदुःख, मानापमान इत्यादि द्वंद्वे नष्ट होतात व त्याला स्थितप्रज्ञाची अवस्था प्राप्त होते.

स्थितप्रज्ञाची स्थिती प्राप्त झाल्यावरही माणसाने नियतकर्मे सोडू नयेत.

२) निष्काम कर्माचा सिद्धांत

सर्व कर्मे माणसास बंधनात टाकतात. पण कर्म निष्कामवृत्तीने म्हणजे फळाची आशा न धरता केले तर ते मुक्तिप्रद होते.

माणसास दोन मार्गाने मुक्ती प्राप्त होऊ शकते : १) कर्ममार्ग किंवा योग-मार्ग व २) सन्यास मार्ग. जीवनात कर्मे करीत असता संघर्ष निर्माण होतात व त्यामुळे माणसे संन्यासमार्गाकडे वळतात. हे संघर्ष निर्माण होण्याचे कारण माणसे कर्मापासून फळाची इच्छा करतात हे होय. पण माणसाने निष्कामवृत्तीने कर्म करावे म्हणजे त्यास संघर्षापासून मुक्त होता येईल.

३) ज्ञानप्राप्तीचा सिद्धांत

कर्ममार्ग किंवा संन्यासमार्ग यापैकी कोणत्याही मार्गाचे अनुकरण केले तरी सत्यज्ञान प्राप्त होते व हे ज्ञानच माणसास उच्च शांतीची स्थिती मिळवून देते.

पण कर्ममार्ग व संन्यासमार्ग यांच्यामध्ये व्यवहाराच्या दृष्टीने विचार करता कर्ममार्ग श्रेष्ठ होय.

४) समाजव्यवस्थेचा सिद्धांत

कर्मयोगाचे आचरण करणाऱ्यासाठी चातुर्वर्ण्यसंस्था हीच आदर्श समाज-रचना आहे. या समाजरचनेत आपल्या स्वधर्माप्रमाणे निष्कामपणे कर्म


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

करीत गेले असता माणसाच्या नैतिक प्रश्नांचे निरसन होते व त्यास मोक्ष-प्राप्ती होते.

भगवद्गीतेत वरील सिद्धांताचे विवरण करताना व्यासांनी सांख्य व उपनिषदे यांच्यातील काही तत्त्वाचा समावेश केला आहे पण व्यासांचा कर्मयोग ही त्यांची स्वतंत्र निर्मिती आहे सांख्य किंवा उपनिषदे यांच्या-पासून अवगामी तर्कपद्धतीने तो निर्मिता येत नाही. त्याचे कर्मसातत्याचे तत्व व निष्कामकर्माचे तत्व सांख्य किंवा उपनिषदे यात आढळून येत नाही.

व्यासांच्या विचारसरणीचा भारतावर झालेला प्रभाव लक्षात घेता या तत्वाची निरपेक्ष रीतीने चर्चा होणे आवश्यक आहे. ही तत्वे पूर्वीच्या काळी समाजात कितपत उपयोगी पडली हे पाहणे जितके आवश्यक आहे, तेवढेच ही तत्वे सध्याच्या गतिमान समाजात कितपत उपयोगी पडू शकतात हेही पाहणे आवश्यक आहे. सध्याच्या जगात आपणास ही तत्त्वे ज्या प्रमाणात उपयोगी पडू शकत असतील त्या प्रमाणात त्यांचे अनुकरण करण्यास हरकत असू नये.

एका दृष्टीने विचार केल्यास ह्या तत्वाचे प्रतिपादन करून व्यासांनी जीवनाच्या तीन अत्यंत महत्त्वाच्या मुद्याला स्पर्श केला असे म्हटले पाहिजे — १) त्यांनी माणसाने जीवनात व्यवसाय कोणता करावा व तो कोणत्या वृत्तीने करावा हे सांगितले. २) त्यांनी संन्यासास विरोध केला व गृहस्थाश्रमाचा पुरस्कार केला. यावरून कुटुंबसंस्थेकडे कोणत्या दृष्टीने पाहावे व समाजरक्षणाच्या बाबीस कां महत्व द्यावे हे सांगितले. ३) त्यांनी वर्णोक्त कर्माचा पुरस्कार करून समाजाशी आपले संबंध कसे ठेवावे ह्या बाबतही मार्गदर्शन केले. ह्याशिवाय नीतिशास्त्राच्या पलीकडील स्थितीचा ( साम्यावस्थेचा ) निर्देश करून इष्टा-निष्टाची निवड कशी करावी हे सांगितले. आधुनिक समाजात या प्रत्येक मुद्याची मनमोकळेपणे चर्चा झाली पाहिजे.

## कर्मसातत्याचा सिद्धान्त

पहिल्याप्रथम आपण त्यांच्या कर्मसातत्याच्या सिद्धान्ताचा विचार करू. लोकमान्य टिळकांनी आपल्या गीतारहस्य या ग्रंथात या सिद्धान्तावर सविस्तर चर्चा केली आहे व गीतेत संन्यासमार्ग व कर्ममार्ग हे दोन्ही महत्वाचे मानले गेले असले तरी शेवटी श्रीकृष्णाने संन्यासमार्गापेक्षा कर्ममार्ग श्रेष्ठ आहे असे सांगितले आहे, व हे सिद्ध करणे हेच गीतेचे उद्दिष्ट आहे असे आपले मत दिले आहे. यापूर्वी शंकराचार्यांनी गीतेवर जी टीका लिहिली होती तिच्यावरून गीता



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

निवृत्तिमार्गाचा प्रचार करणारी आहे अशी भावना लोकमानसात निर्माण झाली होती, लोकमान्य टिळकानी गीतारहस्यात शंकराचार्यांचे मत चुकीचे आहे असे आपले मत मांडून गीता प्रवृत्तीपर आहे हे- आपल्या गीतारहस्यात दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

टिळकांचा गीतारहस्य हा ग्रंथ अत्यंत विद्वत्ताप्रचुर असून त्याने विद्वद्-जनात बरीच मान्यता प्राप्त केली आहे. हा ग्रंथ लिहितांना लोकमान्य टिळकांना पौर्वात्य व पाश्चिमात्य विचारवंताचे सर्व सिद्धांत लक्षात घेऊन आपले निर्णय घेतल्यामुळे लोकमान्य टिळकांचे सर्वच विवेचन आधुनिक विचारास सुसंगत व आधुनिक समाजाचे प्रश्न सोडविण्यास उपयुक्त झाले आहे असा समज जनतेत निर्माण झाला आहे. आमच्या दृष्टीने लोकमान्य टिळकांनी भगवद्गीतेतील काही निवडक विचार आपल्या तर्काच्या जाळ्यात गोवण्यापलिकडे काही विशेष केले नाही. टिळकांच्या मतास अनुभवाचा किंवा प्रयोगाचा आधार नाही. त्यांनी आजच्या गतिमान समाजाच्या ज्वलंत प्रश्नास स्पर्श केला नाही व गीतेतील तत्त्वाच्या आधारे ते कसे सुटू शकतात हेही दाखविले नाही. तरी लोकमान्य टिळकांनी उपस्थित केलेले मुद्दे महत्वाचे असल्यामुळे या लेखात मुख्यत्वेकरून त्यांचाच विचार केलेला आहे. टिळकांच्या विचाराची चर्चा करीत असताना त्यासंबंधीच्या व्यासाच्या विचाराचाही आम्ही परामर्श घेणार आहो व त्यावरून व्यासाची मते कितपत बरोबर होती ह्याचा निर्णय घेणे वाचकास सुकर होईल.

यासाठी पहिल्याप्रथम व्यासानी जीवनाचा जो प्रवृत्तीपर मार्ग सांगितला आहे त्याचा आपण विचार करू. व्यासांच्या पूर्वी समाजास प्रत्येकाचे कर्म कोणते हे सांगणारा धर्म अस्तित्वात नव्हता. कदाचित लोकमान्य टिळक म्हणतात त्याप्रमाणे शुकजनकादिकांनी अनुसरलेली प्रवृत्तीपर परंपरा त्याकाळी असेल. पण तिला प्रतिष्ठा प्राप्त झाली नव्हती. सांख्य व उपनिषदांतील ज्ञान मुख्यत: ज्ञाननिष्ठेला सहाय्यक पण दैनंदिन जीवनात इष्टानिष्ट कोणते हे ठरविण्यात निरुपयोगी असे समजण्यात येत होते. गीताग्रंथामुळे जनतेस प्रत्येक वर्णाने कोणती कर्मे कशी करावी याबाबत मार्गदर्शन प्राप्त झाले व शिवाय कर्माचे तत्वज्ञानही उपलब्ध झाले. नैसर्गिक प्रवृत्तीनुसार वागणाऱ्या समाजास मार्गदर्शक तत्व मिळाले. यामुळे या ज्ञानाची महत्ता वाढली व भारतीय संस्कृतीत कर्ममार्गाचे दिग्दर्शन करणारा महाभारत हा एक श्रेष्ठ ग्रंथ ठरला.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## लोकमान्यांचे कर्मनिरूपण

लोकमान्य टिळकांनी व्यासाप्रमाणेच कर्मसातत्याचा सिद्धांत मांडला आहे. लोकमान्य टिळकांचे विचार समजून घेण्यासाठी आपण भगवद्गीतेत वर्णन केलेल्या रणांगणावरील युद्धप्रसंगाचे चित्र आपल्यासमोर उभे केले पाहिजे.

या युद्धाच्या सुरवातीस आपले आप्तेष्ट मारले जाणार व त्यांना ठार करण्यास आपणच कारण होणार हे पाहून अर्जुनाच्या मनात विषाद निर्माण होतो. या युद्धामुळे धर्माचेही पतन होईल व समाजाचीही घडी बिघडेल अशी त्यास भीती वाटते; व काय करावे व काय करू नये याचा निर्णय न घेता आल्यामुळे तो हताश होतो. ह्या प्रसंगी श्रीकृष्ण त्यास कर्मयोगाचा व सन्यासमार्गाचा उपदेश करतात व सन्यासमार्ग व कर्ममार्ग हे दोन्ही मोक्षदायक असले कर्ममार्ग या दोहोंहून श्रेष्ठ आहे असे प्रतिपादन करतात. अर्जुनास हा विचार पटतो व तो युद्धास तयार होतो. लोकमान्य टिळकांच्या मते गीतेतील हा प्रसंग गीला सन्यासमार्गापेक्षा कर्ममार्ग श्रेष्ठ आहे हे दाखवणारा आहे ही गोष्ट अर्जुनास पटवून देणे हेच गीतेचे प्रयोजन आहे.

लोकमान्य टिळकांनी गीता प्रवृत्तीपर आहे हे पटवून देण्यासाठीच गीतारहस्य हा ग्रंथ लिहिला आहे. कारण याच्यापूर्वी आद्यशंकराचार्य व इतर काही आचार्यांनी सन्यासमार्गाचा पुरस्कार केला होता व गीतेतही माणसाने कर्मयोगाचे आचरण करून नैष्कर्म्यसिद्धी प्राप्त झाल्यावर सन्यासवृत्ती धारण करावी असे सांगितले आहे असे प्रतिपादन केले होते. शंकराचार्यांच्या वैराग्यपर उपदेशामुळे त्यांच्यानंतरच्या काळांत वैराग्यांच्या कल्पनेस महत्व चढले व गीतेची शिकवण निवृत्तिप्रधान आहे असे मानले जाऊ लागले. शंकराचार्यानंतर जे आचार्य होऊन गेले त्यानीही या निवृत्तिमार्गास उचलून धरले. ही स्थिती गेल्या शतकाच्या अंतापर्यंत राहिली. मात्र या शतकाच्या पूर्वार्धात लोकमान्य टिळकांनी शंकराचार्यांचे कर्मासंबंधीचे विचार चुकीचे आहेत. असे ठरवून गीतेतील कर्मयोगाचे नव्याने प्रतिपादन केले. व्यासांनी गीतेत कर्ममार्ग व सन्यास या दोहोंचेही महत्व गाईले असले तरी हा ग्रंथ मुख्यतः कर्ममार्गाचे निरूपण करणारा आहे हे गीतारहस्य या ग्रंथात उघडकीस आणले. गीतारहस्यांत त्यांनी कर्मासंबंधीच्या पौर्वात्य व पाश्चिमात्य सिद्धांताची तुलना करून गीतेची शिकवणूकच सर्वश्रेष्ठ आहे असे मत मांडले.

व्यासाप्रमाणेच लोकमान्य टिळक सन्यासापेक्षा कर्म श्रेष्ठ आहे या मताचे आहेत. कर्माच्या फलात आसक्ती असते. ती कमी कमी करीत जाऊन निष्काम



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बुद्धीने कर्म करीत गेले असता सिद्धावस्था प्राप्त होते. ही अवस्था प्राप्त झाल्या-वरही कर्म करीत राहणे समाजाच्या हिताचे आहे व हीच गीतेची शिकवण आहे असे त्यांचे मत आहे. आपल्या गीतारहस्य या ग्रंथात याच मुद्यावर लोकमान्य टिळकांनी शंकराचार्यांवर हल्ला चढविला आहे. त्यांना चातुर्वर्णाबद्दल विशेष आस्था नाही. गीतेची शिकवण ही अध्यात्मपर व भौतिकवाद्यांच्या कर्मासंबंधीच्या शिकवणुकीहून श्रेष्ठ असून ती सर्व काळी, सर्व ठिकाणच्या समाजास लागू पडण्यासारखी आहे असे त्याचे मत आहे.

गीतेचा अन्वयार्थ करतांना शंकराचार्यांनी कर्मांमुळे मोक्ष कधीच मिळू शकत नाही, कर्मे चित्तशुद्धीसाठी आवश्यक आहेत. पण पुढे कर्मामुळे चित्तशुद्धी झाल्यावर मनुष्य ज्ञाननिष्ठ बनला पाहिजे व मोक्षप्राप्ती केवळ ज्ञानानेच प्राप्त होऊ शकते असे मत मांडले होते. लोकमान्य टिळकांनी या मतास विरोध केला. व गीतेत निष्काम कर्मयोग प्रतिपादला असून निष्काम कर्मयोगाने मोक्षप्राप्ती होते असे सांगितले. याशिवाय सिद्धावस्था प्राप्त झाल्यावरही जगातील सर्व व्यवहार व ज्ञानाला विरुद्ध न समजता ते निष्काम बुद्धीने करीत असावे असेही मत त्यांनी मांडले आहे.

टिळकांच्या मते ज्ञानी पुरुषानेही चातुर्वर्ण्याची ही कर्मे निष्काम बुद्धीने केलीच पाहिजेत ( गी. ३.२५ ) हा गीतेतील कर्मयोग आहे व तो सन्यासमार्गाचे पूर्वांग होऊ शकत नाही. मग प्रश्न काय तो मोक्षप्राप्तीचा. पण निष्कामपणे कर्म करीत गेले असता ज्ञानप्राप्ती झाली असल्यामुळे निष्काम कर्मे बंधनकारक होत नाहीत. संन्यासाने जो मोक्ष मिळवावयाचा तोच या कर्ममार्गानेही प्राप्त होतो. ( गी. ५.५ ) असे गीतेत स्वच्छ सांगितले आहे. म्हणून ज्ञानोत्तर हे दोन्ही मार्ग मोक्ष दृष्टया स्वतंत्र म्हणजे तुल्यबल आहेत असाच गीतावाक्याचा अर्थ घेतला पाहिजे. यावरून सांख्य व योग हे दोन मार्ग मुळापासून स्वतंत्र आहेत हे निर्विवाद सिद्ध होते.

आता कर्म व संन्यास हे सारखेच मोक्षप्रद आहेत एक दुसऱ्याचे पूर्वांग नव्हे असे ठरविले तरी त्यामुळे प्रश्न सुटतोच असे नाही कारण त्यामुळे मग यापैकी जो मार्ग आवडेल तो पत्करावा असे म्हणणे प्राप्त होते. मग अर्जुनाने युद्धच केलें पाहिजे असे सिद्ध न होता भगवंताच्या उपदेशाने परमेश्वरज्ञान प्राप्त होऊनही तो आपल्या अभिरुचीप्रमाणे युद्ध करील किंवा युद्ध करणे सोडून संन्यास घेईल असे दोन पक्ष संभवतात. म्हणून यापैकी प्रशस्त मार्ग कोणता ( गी. ५.१ ) असा अर्जुनाने प्रश्न विचारला.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

यावर श्रीकृष्णाने संन्यास व कर्मयोग हे दोन्ही मार्ग निःश्रेयस म्हणजे मोक्ष देणारे आहेत किंवा मोक्षदृष्टचा सारखेच आहेत तरी या दोहोमध्ये कर्मयोगाची मातब्बरी किंवा योग्यता विशेष आहे ( गी. ५.२ ) असे स्पष्टपणे म्हटले आहे. एखाद्या कर्माचे भयंकर परिणाम डोळ्यासमोर दिसत असतानाही शाहण्या माणसाने ते कर्म केले पाहिजे हे सांगण्यासाठीच गीताशास्त्राची प्रवृत्ती झाली असून गीतेचे जे काही वैशिष्टच आहे तेही हेच होय.

ज्ञानापेक्षा कर्म श्रेष्ठ आहे व सिद्धावस्था प्राप्त झाल्यावरही कर्म करीत राहिले पाहिजे हे गीतेच्या साह्याने पटवून देताना लो. टिळकांनी मांडलेले वरील मुद्दे मनोरंजक आहेत यात शंकाच नाही. पण त्यांच्यामुळे आपणास वास्तवतेचे ज्ञान प्राप्त होत नाही. त्यांची सत्यासत्यता आपणास व्यासाच्या प्रमाणावरच स्वीकारावी लागते पण व्यासास प्रमाण न मानताही आपणास या मुद्यांची चर्चा करता आली पाहिजे. यासाठी व्यासाचे हे विचार कितपत योग्य व आपल्या समाजजीवनास कितपत उपयुक्त आहेत याचा आपण स्वतंत्रपणे विचार करू. व्यासाचे हे विचार गीतेतच दुसरे जे विचार आले आहेत त्याच्याशी कितपत सुसंगत आहेत हे पाहूनही आपणास त्याची सत्यासत्यता पाहता येईल.

प्रथम व्यवहाराच्या दृष्टीकोनातून या प्रश्नांची चर्चा करू. सर्वसाधारण-पणे आपण कर्माचे परिणाम लक्षात घेऊन एखादे कर्म इष्ट की अनिष्ट हे ठर-वीत असतो. पण हे परिणाम लक्षात न घेऊन इष्ट ते कर्म करीत गेले पाहिजे असे लोकमान्य टिळक म्हणतात. व्यासांचे म्हणणेही हेच असावे असे वाटते. कारण अर्जुनाने युद्धाच्या परिणामाचे जे चित्र उभे केले त्याकडे डोळेझाक करून श्रीकृष्णानी त्यास युद्ध करण्यास प्रवृत्त केले. या युद्धानंतर युद्धाच्या भयंकर परिणामाची झळ भारतास लागली. युद्धात अगणित सैनिक मारले गेलेच. पण पुढे ज्या सुखासाठी युद्ध करणे कौरव व पांडवात इष्ट वाटले ते सुखही पुरते-पणी त्यास लाभले नाही व नंतरचा समाज दुर्बल बनला. आणि हे सर्व त्यानी कशासाठी केले ? तर समाजात असलेल्या परंपरा टिकविण्यासाठी व मोक्ष-प्राप्तीसाठी. तेव्हा लोकमान्य टिळकांचे वरील मत ग्राह्य धरले तर ऐहिक व पारमार्थिक दृष्टीने समाजाच्या परंपरा टिकवून धरणे हेच व्यवहार्य व इष्ट आहे. मग त्यासाठी कितीही किंमत द्यावी लागली तरी हरकत नाही. असा निष्कर्ष काढणे भाग पडते.

दुसरी गोष्ट अशी की युद्धात लढणे हे रजोगुणी माणसाचे कर्म होय. मूलतःच सत्वगुणाने संपन्न असणारा मनुष्य युद्धांत लढणार नाही. कारण युद्ध-

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रवृत्ती रजोगुणामुळे निर्माण होते. जोपर्यंत ही प्रवृत्ती माणसात आहे तोपर्यंत तो लढणारच. येथे व्यासांचे म्हणणे एवढेच दिसते की अर्जुनाने निष्कामवृत्तीने युद्धात लढावे म्हणजे सत्वगुणी माणसे ज्याप्रमाणे कर्मफलाच्या इच्छेने काम करीत नाहीत त्याप्रमाणे कर्मफलाची इच्छा न धरता लढावे. मनुष्य कोणत्याही वर्णाचा असो त्याने आपल्या वर्णाचे काम निष्कामवृत्तीने करावे म्हणजे त्यास कर्माचे बंधन राहणार नाही. असे करीत असताना त्याला ज्ञानप्राप्ती होईल व ज्ञानप्राप्ती झाली म्हणजे तो गुणाच्या पलीकडे जातो. एवढे मान्य केल्यावरही येथे अडचण उपस्थित होतेच. माणसास ज्ञानप्राप्ती झाल्यावर तो त्रिगुणातीत होतो याचा अर्थ काय करावयाचा ? मनुष्य इष्ट ते ज्ञान प्राप्त झाल्यावर त्रिगुणातीत होतो असे श्रीकृष्ण सांगतात. अर्थात गीतेतील तत्त्वज्ञान जर व्यक्तीला गुणाच्या पलीकडे नेणारे असेल तर त्या व्यक्तीच्या वर्णात फरक पडला पाहिजे म्हणजे तिच्या स्वभावात बदल झाला पाहिजे व अशा रीतीने जर व्यक्तीच्या स्वभावात बदल होत असेल तर व्यक्तीने प्रत्येक वेळी आपल्या बदललेल्या स्वभावास अनुसरून योग्य ते कर्म करणे हे उचित नाही काय ? दुसऱ्या शब्दात गीतेची शिकवण कर्माचे सातत्य प्रस्थापित करणारी आहे किंवा व्यक्ती गुणाच्या पलीकडे जात असताना तिच्या कर्माचा क्षय होतो हे मानणारी आहे ? गीतेच्या प्रतिपादनात व्यासानीं या प्रश्नाचे स्पष्ट उत्तर दिलेले नाही.

महाभारतात धर्मराज क्षत्रिय असूनही सत्वगुणी प्रवृत्तीचा दाखविला आहे. धर्मराज भीम, अर्जुन एकमेकांचे भाऊ व एकाच वर्णाचे असूनही त्यांच्या स्वभावात फरक आहे. धर्मराज सत्वगुणी प्रवृत्तीचा आहे तर अर्जुन रजोगुणी आहे. यावरून एकाच वर्णाचे लोक निरनिराळ्या गुणाचे असू शकतात असा त्यावरून निष्कर्ष निघतो. श्रीकृष्णाने अर्जुनास सत्यज्ञान दिल्यावर जर तो सत्वगुणी किंवा त्रिगुणातीत झाला असता तर मग त्याच्या वागणुकीत निदान सत्वगुणी माणसाप्रमाणे बदल दिसायला हवे होते.

या व यासारख्या अनेक प्रश्नांच्या चर्चेत सध्याच न शिरता येथे आम्ही गीतेत आलेल्या काही महत्त्वाच्या शब्दाचा गीतेतील विषयाच्या अनुषंगाने किंवा अन्य रीतीने काही अर्थ लागतो काय व त्यावरून गीतेतील विवेचन अर्थपूर्ण आहे काय याचा विचार करू. यासाठी गीतेतील निष्कामकर्म नैष्कर्म्यसिद्धी, व ज्ञान या शब्दाचा अर्थ काय करावा ते पाहू. भगवद्‌गीतेत अर्जुनाने श्रीकृष्णास कर्म निष्कामवृत्तीने करण्याचा आदेश दिलेला


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आहे. हे निष्कामकर्म म्हणजे काय ? व त्यामुळे नैष्कर्म्यसिद्धी प्राप्त होते असे म्हटले आहे त्याचा अर्थ काय करावा ? निष्कामकर्म करीत गेले असता व्यक्तीला ज्ञान प्राप्त होईल काय ? व ज्ञानप्राप्ती होत असेल तर ते ज्ञान कोणत्या प्रकारचे असेल ? हे महत्त्वाचे प्रश्न आहेत. ह्या प्रश्नाची शक्यतो तटस्थतेने चर्चा करण्याचा आपण प्रयत्न करू.

## निष्काम कर्माचा अर्थ

पहिल्याप्रथम निष्कामकर्म या शब्दाचा काय अर्थ होतो ते पाहू. निष्काम-कर्म या शब्दाचा शब्दकोशाप्रमाणे अर्थ पाहू गेल्यास इच्छेविरहित कर्म असा याचा अर्थ होतो असे आढळून येते. पण माणसे म्हटली की त्यांना इच्छा असणारच. इच्छेशिवाय मनुष्य नाही हे आपण पाहतो. इच्छा-व्यक्तीत कशाची तरी कमी आहे, तिला कशाची तरी गरज आहे. व त्या इच्छेची पूर्ती करून ती गरज भागवावयाची आहे हे दर्शविते. जेथे इच्छा आहे तेथे द्वैत आहे. इच्छा आपणाहून जग वेगळे आहे व त्यापासून आपणास काही प्राप्त करावयाचे आहे हे सूचित करते. इच्छा कर्म करण्यास प्रवृत्त करते व कर्म केले की त्या कर्मापासून मनुष्य कोणत्यातरी फलाची इच्छा करतो. व ही फलाची इच्छा त्याच्या जीवनात निरनिराळ्या प्रकारची गुंता-गुंत निर्माण करते. व्यासांच्या मते कर्मे जीवनात संघर्ष निर्माण होतात म्हणून माणसाने फक्त शास्त्रोक्त कर्म करावे व असे कर्म करीत असताना त्याच्या परिणामाकडे पाहू नये. दुसऱ्या शब्दात आपल्या बुद्धीचा वापर न करता माणसाने शास्त्रोक्त कर्मे यंत्रवत् करावी. इंद्रियजन्य सुख प्राप्त कर-ण्याच्या प्रवृत्तीस आवरून धरावे. अशा रीतीने कर्मे केली असता माणसाला मोक्षप्राप्ती होते.

आता आपण स्वतःचे व भोवतालच्या जगाचे निरीक्षण केले तर आपण बहुधा कर्मे फलप्राप्तीच्या इच्छेनेच करतो असे आपणास आढळते. पण व्यक्ती स्वतःच्या इच्छेपासून मुक्त असली तर कदाचित तिच्या क्रिया स्वयंस्फूर्तीने घडतील व त्या परिस्थितीत तिच्या स्वतःच्या इच्छा नसल्यामुळे ती कोणतेही कर्म शास्त्रास प्रमाण मानून कर्तव्य म्हणून करणार नाही.

काही परिस्थितीत सर्वसामान्य माणूस आपल्या क्रियाफळाची इच्छा न करताना आढळतो. उदाहरणार्थ एखादी व्यक्ती खेळत असेल, गाणे गात असेल, किंवा स्वतःचे देहभान हरपून एखाद्या कृत्यांत लीन झालेली असेल, त्यावेळी तिच्या, क्रिया स्वयंस्फुर्तीने घडतील. पण स्वयंस्फूर्तीने केलेल्या कोणत्याही क्रियेस

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

इच्छेहीन क्रिया असे नांव जरी देता आले नाही तरी फलाची इच्छा न धरता केलेली क्रिया असे नांव आपण देऊ शकू. मुलांचे गाणे त्यांच्या आत्मप्रगटीकरणासाठी असते. काही इच्छित फलप्राप्तीसाठी नव्हे. तीच गोष्ट अनेक रिकामपणच्या छंदाविषयी सांगता येईल. यावेळी आपण जे कर्म करतो ते काही लाभासाठी नसून त्या कामामध्येच जो आनंद आहे त्यासाठी असते. Art for the sake of art ही म्हण आपल्याकडे प्रसिद्ध आहे.

वरील कर्मे सोडून दिली तर बाकीची आपली सर्व कर्मे काहीतरी लाभासाठी असतात., व ती निसर्गाचे व संस्कृतीचे माणसावर जे संस्कार घडतात त्यानुसार घडत असतात व्यक्ती शास्त्राचे प्रामाण्य स्वीकारणारी असेल तर तिच्या क्रिया शास्त्राप्रमाणे घडतील. ह्या क्रियांस सकाम क्रिया असे नांव दिले पाहिजे. एखाद्या व्यक्तीच्या एका विशिष्ट वेळच्या क्रिया कशा प्रकारच्या आहेत हे त्या व्यक्तीच्या झालेल्या पूर्वसंस्कारावर अवलंबून आहे. तिने एखाद्या व्यक्तीचे, किंवा धर्माचे प्रामाण्य स्वीकारले असेल. तर मग तिच्या क्रिया स्वतंत्र आहेत असे आपणास म्हणता यावयाचे नाही. व्यक्ती प्रमाण स्वीकारते याचाच अर्थ असा की तिला बाह्य जगापासून काहीतरी हवे असते. ते प्राप्त करण्यासाठी ती कर्मे करील. अशा स्थितीत तिच्या क्रिया हेतुविरहित आहेत असे आपणास म्हणता यावयाचे नाही व जेथे हेतू आहे तेथे बहुधा कर्मफलाची इच्छा असतेच. एखादी व्यक्ती कर्मे करीत असताना तिचे हेतू तिला स्पष्ट नसतील ते जाणिवेच्या पातळीवर नसतील. पण म्हणून ती आपल्या क्रियापासून कोणत्याच फलाची अपेक्षा करीत नाही असे नसते. अनेकदा आपल्या क्रिया भरमसाटपणाच्या असतात. त्या इच्छेरहित आहेत असे आपल्याला वाटते. पण क्रिया बुद्धिमत्तेच्या असो किंवा भरमसाटपणाच्या असो त्या आपल्या इच्छेने घडून येतात. कधीकधी आपल्या इच्छा व आपले हेतू जाणिवेच्या पातळीवर नसतात व म्हणून आपल्या क्रिया इच्छाहीन आहेत असे आपण समजतो पण ह्या इच्छा आपल्या जाणिवेच्या पातळीच्या खाली आपल्या अचेतन मनामध्ये असतात ही गोष्ट मनोविज्ञानशास्त्रज्ञांनी प्रयोगाने सिद्ध केलेली आहे; व कोणासही अनुभवाने तिचे सत्यत्व पडताळून पाहता येते.

जे कर्म आपण स्वतःच्या लाभासाठी करीत नाही, दुसऱ्यासाठी करतो ते निष्काम कर्म होय अशी काही लोक निष्काम कर्माची व्याख्या करतील. पण ही व्याख्या बरोबर होणार नाही. कारण एखादी व्यक्ती दुसऱ्यासाठी एखादे

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कर्म करताना दिसत असली तरी ते कर्म ती पर्यायाने स्वतःसाठीच करीत असते. दुसऱ्यासाठी कर्म करीत असताना स्वतःसाठी काहीतरी प्राप्त व्हावे असा तिचा हेतू असतो. बृहदारण्यक उपनिषदात या मुद्याची चर्चा चांगल्या रीतीने केलेली आढळते. या उपनिषदातील एका गोष्टीत याज्ञवल्क्य व मैत्रेयी यांचा संवाद आला आहे. भौतिक संपत्ती अमरत्वाकडे नेणारी नाही म्हणून याज्ञवल्कयाची पत्नी मैत्रेयी संपत्तीचा त्याग करते व आपल्या पतीकडून जीवनाच्या अत्युच्च सत्याविषयीचे ज्ञान प्राप्त करते. याज्ञवल्कय प्रत्येक वस्तूला जे मूल्य आहे ते त्या वस्तूचे स्वयंभू नसून वस्तूचे मूल्य ती वस्तू स्वतःला तेवढी उपयोगी पडते त्यावरून ठरविले जाते असा उपदेश करतात. अर्थात प्रत्येकजण आपल्या स्वतःवरील प्रेमामुळे इतर वस्तूवर प्रेम करतो व त्याच्यासाठी त्याग करतो. मैत्रेयी पतीला विचारते, " महाराज, संपत्तीयुक्त पृथ्वी पूर्णपणे माझी झाली तर मला अमरत्व मिळेल काय ? याज्ञवल्कय नकारार्थी उत्तर देतात. याज्ञवल्कय सांगतात ' पतीवरील प्रेमामुळे पती प्रिय होत नाही तर स्वतःवरील प्रेमामुळे स्त्रीला पती प्रिय होतो. याज्ञवल्कय स्त्री, पुत्र, द्रव्य, द्विजत्व, क्षत्रियत्व व सर्व जग, देव व सृष्टीविषयी ही याच प्रकारची विधाने करतात. माणसाचे या वस्तूवर मूलतः प्रेम नसते. तर स्वतःवरील प्रेमामुळे तो दुसऱ्यावर प्रेम करते व त्याची सेवा करते. आपण प्रेम ही एका व्यक्तीने दुसऱ्या व्यक्तीवर किंवा वस्तूवर करणे एक बाब आहे असे समजतो. व अशा प्रेमासाठी धडपडतो. पण ही एक प्रकारची आसक्तीच आहे.

बहुतेक लोकांच्या स्वार्थ व निस्वार्थ ह्यासंबंधीच्या कल्पना चुकीच्या असतात. आपल्या स्वार्थाच्या रूढ कल्पनेपेक्षा एखादे कर्म वेगळे वाटले तर ते निःस्वार्थी किंवा निष्काम कर्म आहे असे मानण्याचा मोह आपल्यास होतो. अनेकदा आपण आपल्यापेक्षा उच्च ध्येयाशी किंवा एखाद्या मोठ्या संस्थेशी समरस होतो. त्या ध्येयासाठी किंवा संस्थेसाठी काम करतो व ते काम निष्कामकर्म आहे असे समजून चालतो. पण वास्तविकपणे ते काम सकामच असते.

जेथे बौद्धिक स्वातंत्र्य नाही तेथे कोणत्या ना कोणत्या प्रकारची आसक्ती असलीच पाहिजे. आसक्तीने केलेले कर्म हे सकाम कर्म होय. आपल्या वृत्तीत मोकळेपणा व निष्कपटता व बौद्धिक स्वातंत्र्य असल्याशिवाय आपले कोणतेही कर्म या पदवीस प्राप्त होऊ शकत नाही.

बौद्धिक स्वातंत्र्याशिवाय अनासक्ती शक्य नाही. एखादी व्यक्ती कोणत्याही ध्येयाने प्रेरित होऊन कर्म करीत असेल तर ती त्या ध्येयाने बद्ध आहे असे

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपण म्हटले पाहिजे व मोक्षप्राप्ती हे जरी ध्येय मानले तरी त्यास हाच नियम लागू पडतो. व्यक्ती जेव्हा मोक्ष हे जीवनाचे ध्येय म्हणून स्वीकारते व त्यास अमुक अमुक साधन आहे हे दुसऱ्याच्या प्रमाणावर स्वीकारते तेथे बौद्धिक स्वातंत्र्य व मोकळेपणा नष्ट झालाच म्हणून समजावे. त्या परिस्थितीत व्यक्तीच्या क्रिया निष्कामवृत्तीने घडत आहेत असे आपण कसे म्हणू शकतो? व्यक्तीने कोणती क्रिया करावी व कोणती करू नये हे ठरविताना कोणत्याही क्रियेचा कार्यकारणसंबंध पाहण्याचे व तो समजून घेण्याचे स्वातंत्र्य जेथे नाही तेथे व्यक्ती निष्कामवृत्तीने वागते असे आपण म्हणू शकत नाही. संशोधकाच्या क्रिया हेतुपूर्णच असतात. पण आपल्या संशोधनाचा निष्कर्ष अमुकच असावा अशी इच्छा धरून तो संशोधन करीत नाही. संशोधन करीत असताना जे काही सत्य आढळेल ते स्वीकारण्याची त्याची तयारी असते. संशोधकाचे संशोधन इच्छाहीन असते याचा अर्थ ते त्याच्या स्वतःच्या स्वार्थी हेतूने बद्ध नसते. त्याचे निरीक्षण प्रामाणिकपणाचे तटस्थतेचे असते. या अर्थाने आपण निष्काम कर्म हा शब्द वापरू शकतो. संशोधकाचे हे कार्य ज्या प्रमाणात निरपेक्षबुद्धीने केले जात असेल व ज्या प्रमाणात संशोधक पैसा, प्रतिष्ठा, यश इत्यादीच्या मोहापासून मुक्त असेल त्या प्रमाणात त्याच्या संशोधनकार्यास निष्काम कर्म असे नाव देता येईल.

अशा रीतीने निष्काम वृत्तीने वागण्यासाठी व्यक्तीमध्ये प्रखर सत्यनिष्ठा असावी लागते. प्रयोगशाळेत निष्काम वृत्तीने वागणारा संशोधक आपल्या नित्याच्या व्यवहारात सत्य शोधण्याच्या वृत्तीने वागत नाही. सामान्य माणसाचा विचार केला तर तो कोठेच सत्यसंशोधनाच्या वृत्तीने वागत नाही असे आपणास दिसून येते. प्रत्येक जणाची काही ठराविक मते असतात व ती खरी आहेत किंवा नाही हे तपासण्याचा मोकळेपणा सहसा त्यांच्यात आढळत नाही. प्रत्येक व्यक्ती कोणत्या तरी पक्षात गुरफटलेली दिसते. सत्यनिष्ठेपेक्षा आपणास पक्षनिष्ठा जातिनिष्ठा किंवा धर्मनिष्ठाच अधिक प्रिय असते. आपण आपल्या पक्षाच्या तत्वप्रणालीस इतके वाहून गेलेलो असतो की दुसऱ्या पक्षाच्या क्रियेचा आपल्या आकुंचित पक्षनिष्ठ दृष्टिकोनातून अर्थ लावीत असतो व अनेकदा त्याला विकृत स्वरूप देत असतो. आपलाच धर्म श्रेष्ठ आहे असे समजून दुसऱ्याच्या धर्मतत्वाचा अर्थ लावीत असतो. जेथे आपल्याच धर्माकडे निष्काम वृत्तीने पाहण्याचे सामर्थ्य आपल्यात नसते. तेथे दुसऱ्याच्या धर्माकडे निष्काम वृत्तीने पाहाण्याचे सामर्थ्य कोठून येणार? आपण आपलाच देश सर्वश्रेष्ठ

अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आहे असे समजून दुसऱ्या देशावर टीका करीत असतो व यालाच राष्ट्रप्रेम असे नाव देतो. अशा पद्धतीने पक्षाविषयी, धर्माविषयी किंवा राष्ट्राविषयी आसक्ती बाळगणारी व्यक्ती प्रत्येक बाबतीत खरे बोलावे या अर्थाने कितीही सत्यनिष्ठ असली तरी ती खऱ्या अर्थाने सत्यनिष्ठ नसते. दैनंदिन व्यवहारात खरे बोलणारी व्यक्ती सत्यनिष्ठेपेक्षा पक्षनिष्ठा वा जातीनिष्ठा याला जास्त महत्त्व देत असेल तर तिचे कर्म निष्काम कर्म होय असे आपणास म्हणताच यावयाचे नाही.

महाभारताचा विचार केल्यास त्यातील बहुतेक पात्रे निरनिराळ्या गुणानी नटलेली आहेत असे दिसते. त्यांच्यात शौर्य, उद्योगशीलता, स्वाभिमान व शिस्त आहे. महाभारतात वर्णिलेल्या अनेक व्यक्ती शहाण्या आहेत त्यात युधिष्ठिरासारख्या सत्यप्रिय व्यक्ति आहेत. भीष्मासारखे आपल्या प्रतिज्ञापूर्तीसाठी आजन्म ब्रह्मचारी राहणारे आहेत. वचनपूर्तीसाठी वनवास व अज्ञातवास सहन करणारे आहेत. हे सर्व गुण असूनही त्यांच्यात काहीतरी उणे आहे असे आपणास वाटते. ते रूढीप्रिय आहेत पण स्वातंत्र्यप्रिय नाहीत. आपण जीवन व आपली बुद्धी समाजाच्या उत्कर्षासाठी खर्च करण्याऐवजी त्यांनी युद्धाद्वारे समाजाची राखरांगोळी केली. संसाराचा उपभोग घेण्यासाठी ते धडपडले पण पुढे त्यांच्यापैकी काही जणास निराशेने संसारत्याग करावा लागला. परंपरेचे दास म्हणूनच ते राहिले, आपल्या पुढील पिढ्या उत्कर्षाप्रत नेण्यास आवश्यक असे गुण असूनही प्राप्त परिस्थितीत कोणती पावले उचलावी याचे अनासक्तपणे परीक्षण करणे त्यांना साधले नाही. ज्या सुखाच्या प्राप्तीसाठी ते आमरण झगडले ते सुखही त्यांना पुरतेपणी मिळू शकले नाही.

निष्काम कर्म करणे म्हणजे स्वार्थ सोडून एखाद्या पक्षाचे अत्यंत कसी सोबदला घेऊन काम करणे नव्हे. पक्षासाठी लाखो रुपयाचा त्याग करणारी किंवा प्राण देणारी व्यक्तीही सकामतेने वागणारी असते. या दृष्टीने पाहिले असता भीष्माने आपल्या जीवनात कितीही त्याग केला असला तरी त्याची पक्षनिष्ठता त्याची सकामवृत्तीच प्रदर्शित करते. पांडवांची बाजू न्याय्य आहे हे मान्य असूनही कौरवांच्या बाजूस चिकटून राहावे त्याने जास्त पसंत केले. काही व्यक्ती सामान्यतः आपणास प्रामाणिक व निष्कामवृत्तीच्या भासतात. म्हणजे त्यांच्याशी चर्चा करताना, किंवा ती व्याख्याने देत असताना निःपक्षपाती व सत्यनिष्ठ आहेत असे आपणास वाटते. पण अशाही व्यक्ती बहुधा आपली जात, पक्ष, धर्म, किंवा राष्ट्र यांना चिकटून असतात. व ज्यावेळी चर्चेचा ओघ

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्यांची जात किंवा पक्ष यांच्याकडे वळतो त्यावेळी पक्षस्वार्थास स्पर्श केल्याबरोबर ते त्या विषयाकडे तटस्थतेने पाहण्याचे सोडून देतात. अशा व्यक्तींना बौद्धिक स्वातंत्र्य नाही हे स्पष्ट होते. अशा व्यक्तीचे कर्म कितीही त्यागमय दिसले तरी ते सकाम कर्म असते.

वरील विवेचनावरून आजपर्यंत भारतात अनासक्तवृत्तीची, निष्कामप्रवृत्तीची भरपूर चर्चा झाली असली तरी निष्कामप्रवृत्ती ही एक दुर्मिळ गोष्ट आहे असे आपणास आढळेल. याचा अर्थ भारतात किंवा अन्यत्र वाङमय, कला व इतर क्षेत्रात निष्काम वृत्तीच्या व्यक्ती होऊनच गेल्या नाहीत असे नाही. पण एकंदरीत अशा व्यक्ती विरळाच. आता विज्ञानाच्या क्षेत्रात संशोधन करणारा शास्त्रज्ञ, न्यायालयात निस्पृहपणे न्याय देणारा न्यायाधीश किंवा रोगी वाचला पाहिजे म्हणून स्वतःच्या अडचणीची पर्वा न करता त्याग वृत्तीने कार्य करणारा वैद्य ही निष्काम कर्म करणाऱ्या व्यक्तीची उदाहरणे आहेत. व्यवहारात मात्र अशा रीतीने निष्काम कर्म करणाऱ्या व्यक्ती विरळाच. कारण ज्याचा 'मी' पणा नष्ट झाला आहे अशा व्यक्तीच खऱ्या अर्थाने निष्काम कर्म करतात. पण 'मी' पणा नष्ट होणे ही साधी गोष्ट नाही.

वर वैज्ञानिक किंवा न्यायाधीश निष्काम वृत्तीने वागत असतो असे म्हटले आहे पण त्याचेही कार्य एका अर्थाने सकामच असते ही गोष्ट नाकारता येणार नाही. वैज्ञानिकावर त्याने काम कोणते करावे व ते कसे करावे यासंबंधी बाह्य दडपण नसते. ही गोष्ट खरी असली तरी वैज्ञानिक जर एखाद्या गोष्टीचा शोध करण्याची भूमिका पत्करूनच जर संशोधन करीत असेल तर त्याचे कार्य सकाम या सदराखाली मोडेल. तो ज्या प्रमाणात पूर्वग्रहापासून मुक्त असेल व ज्या प्रमाणात तो त्याच्यासमोरील तथ्याकडे उदासीनतेने पाहील त्या प्रमाणात त्याचे कार्य निष्काम आहे असे आपण म्हणू शकू. न्यायाधिशाचीही गोष्ट काही प्रमाणात याच प्रकारची आहे. आपल्यासमोरील तथ्यांचा ( facts ) अर्थ तो प्रस्थापित कायद्याच्या दृष्टिकोनातून करीत असतो. त्यावेळी आपले पूर्वग्रह त्याने बाजूस सारले पाहिजेत. तरच त्याचे निर्णय निष्काम या सदरात मोडतील. न्यायाधीशाने निस्पृहपणे वागले पाहिजे व कायद्याचा अर्थ त्याला जसा दिसतो तसाच केला पाहिजे. घटनांचा अर्थ लावताना प्रस्थापित कायदा दोषपूर्ण आहे असे न्यायाधीशास वाटत असेल व तरीही त्या कायद्याला धरून तो निर्णय देत असेल तर तो न्यायाधीश निष्कामपणे वागतो असे आपणास म्हणता यावयाचे नाही. अशा वेळी आपली मते प्रस्थापित कायद्याच्या विरुद्ध जात

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असल्यास त्याने राजीनामा दिला पाहिजे व आपण स्वतःशी प्रतारणा करीत नाही हे त्याने दाखवून दिले पाहिजे.

आतापर्यंत निष्काम कर्माची जी चर्चा केली त्यावरून कोणासही कर्म निष्कामपणे करावयाचे असल्यास तो सत्यनिष्ठ असला पाहिजे व आपल्या कर्मांचा हेतू कोणता व त्याचे परिणाम कोणते होतात याकडेही त्याचे लक्ष असले पाहिजे हे स्पष्ट होते. आपण जोपर्यंत आपले हेतु न्याहाळून पाहत नाही तोपर्यंत आपण भ्रमात राहतो असे म्हणण्यास हरकत नाही. हेतू न्याहाळून पाहिल्याने आपल्या असंख्य हेतूंचे आपणास दर्शन घडते. पण वेदव्यासांनी माणसाने कर्मांच्या फळाची आशा न धरता केलेले नियत कर्म या मर्यादित अर्थाने हा शब्द वापरला आहे, अशा रीतीने केलेल्या कर्मात बौद्धिक स्वातंत्र्य नसते. आपले कर्म इष्ट किंवा अनिष्ट हे त्याचा स्वतःवर व इतरावर कोणता परिणाम होतो हे पाहण्याचे स्वातंत्र्य नसते. केवळ प्रमाणावर विश्वास ठेवणारी व्यक्तीच अशा प्रकारचे 'निष्काम' कर्म करू शकते. अशा रीतीने स्वतःच्या गरजा व समाजाच्या बदलत्या गरजा लक्षात न घेताच यंत्रवत केलेले कर्म परिणामी घातक ठरते.

आपले प्रत्येक कर्म बहुधा सकाम असते हे पाहिल्यावर आता ज्ञान या शब्दाचा कोणता अर्थ होतो ते आपण पाहू. येथे व्यासाच्या मनांत ज्ञान या शब्दाचा कोणता अर्थ होता हे स्पष्ट नाही. बहुधा ज्ञान म्हणजे सत्याचे शाब्दिक ज्ञान असा त्यांनी या शब्दाचा अर्थ केला असावा. लोकमान्य टिळकांनी त्यांचाच कित्ता गिरवून ज्ञान म्हणजे शाब्दिक ज्ञान असा शब्दाचा अर्थ केला आहे. व या शाब्दिक ज्ञानाने सिद्धावस्था प्राप्त होते असे त्याना वाटत असावे कारण युद्धाच्या वेळी श्रीकृष्णाने अर्जुनास सत्यज्ञान प्राप्त झाले व या ज्ञानप्राप्तीनंतर त्याने आपल्या अभिरुचीप्रमाणे युद्ध करणे सोडून सन्यास घ्यावा असा प्रश्न अर्जुना-समोर निर्माण झाला असे टिळकांनी म्हटले आहे. टिळकांच्या विधानाचा रोख ब्रह्मज्ञान प्राप्त झाल्यानंतरही माणसाने शास्त्रोक्त कर्म करीत असावे या मतां-कडे असून श्रीकृष्णाच्या उपदेशानंतर अर्जुनास पूर्णज्ञान प्राप्त झाले होते व त्या नंतर युद्ध करावे किंवा करू नये असा प्रश्न त्याच्यासमोर निर्माण झाला होता असे त्यांना वाटते; पण अर्जुनास झालेले ज्ञान केवळ शाब्दिक होते. कारण या उपदेशानंतर त्याला स्थितप्रज्ञाची अवस्था प्राप्त झाली असा पुरावा नाही. श्रीकृष्णाने दिलेल्या शाब्दिक ज्ञानामुळे अर्जुनास मोक्ष प्राप्त झाला किंवा तो त्रिगुणातीत झाला असे म्हणता येत नाही. केवळ शाब्दिक ज्ञानाने लोक मुक्त


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

होत नाहीत. शाब्दिक ज्ञानाने लोक मुक्त झाले असते तर आतापर्यंत ज्या असंख्य लोकानी गीताग्रंथ वाचला व त्याचे मनन केले त्यांच्यात मुक्त माणसाची लक्षणे दिसून आली असती.

येथे कोणी असे म्हणतील की मोक्षप्राप्तीसाठी केवळ ज्ञान उपयोगाचे नाही त्या ज्ञानाचे सतत मनन केले पाहिजे व त्या ज्ञानाच्या सत्यतेचा प्रत्यक्ष अनुभव आला पाहिजे. ही गोष्ट जर खरी असेल तर अर्जुनास अशा प्रकारचा अनुभव आला नव्हता हे उघड आहे. अर्जुनास युद्धाच्या वेळी अशा प्रकारचा अनुभव आला नव्हता व म्हणूनच श्रीकृष्णाने अर्जुनास प्रत्यक्ष युद्धात भाग घेऊन कर्माद्वारे सत्याचा अनुभव घेण्याचे आवाहन केले असे कोणी म्हणेल आणि हे जर खरे असेल तर मग श्रीकृष्णाच्या उपदेशानंतर अर्जुनास सत्यज्ञान प्राप्त झाले होते व स्थितप्रज्ञाची स्थिती प्राप्त झाल्यावर त्याच्यासमोर युद्ध करावे किंवा सन्यास घ्यावा असा प्रश्न निर्माण झाला होता असे जे लोकमान्य टिळकांनी म्हटले आहे ते सपशेल चूक आहे असे दिसून येते.

युद्धाच्या वेळी अर्जुनास प्राप्त झालेले ज्ञान केवळ शाब्दिक होते. हे आपणास अनेक रीतीने दाखविता येते श्रीकृष्णाच्या उपदेशानंतर अर्जुन युद्ध करण्यास प्रवृत्त झाला खरा पण हे ज्ञान प्राप्त केल्यावर तो निष्काम वृत्तीने लढू लागला असे मुळीच दिसून येत नाही. वास्तविक पाहता हे युद्ध जिंकलेच पाहिजे हा हेतू समोर ठेवूनच त्याने युद्धात साधनांची योजना केली. यशप्राप्तीच्या हेतूनेच प्रत्येक जण या युद्धात लढत राहिला. त्यांनी युद्धाचे नियम पाळले खरे पण प्रसंगी या नियमास झुगारून देऊनही ते लढत राहिले या बाबतीत अर्जुन, इतर पांडव तसेच इतर लोक यात मुळीच फरक दिसून येत नाही. या युद्धात भाग घेणाऱ्या लोकांसमोर सत्यान्वेशण किंवा युद्ध हा पर्याय नाही. युद्ध जिंकण्यासाठीच ते लढतात. युद्धानंतरही जीवन जगताना रूढ मार्गानेच ते आचरण करतात. समाजात त्या रूढी आहेत. त्यानुसार वागले पाहिजे एवढेच त्यांना समजते. या बाबतीत अर्जुन व लढाईत भाग घेणारे इतर लोक यात फरक दिसून येत नाही. या युद्धात अर्जुन निष्कामवृत्तीने लढण्याचा प्रयत्न करीत राहिला असाही पुरावा नाही. श्रीकृष्णाच्या उपदेशाने केवळ त्यास युद्ध करण्यास प्रवृत्त केले. एवढेच आपणास दिसते.

सिद्धावस्थेसंबंधी लोकांच्या विविध प्रकारच्या कल्पना असतात पण गीतेत आलेले सिद्धावस्थेचे वर्णन अगदी स्पष्ट आहे. सिद्धावस्था म्हणजे



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

( harmony ) संवादाची स्थिती. ही अवस्था प्राप्त झाल्यावर माणसास सर्वहितसमभाव निर्माण होतो, आपपरभाव राहत नाही असे श्रेष्ठजन सांगतात. ही गोष्ट साध्य होण्यासाठी माणसाला द्वेष व प्रेम, सुखदुःख; मान अपमान इत्यादि द्वंद्वापासून मुक्त होणे आवश्यक असते. बृहदारण्यक उपनिषदात याज्ञवल्क्य आपल्या स्त्रीला उपदेश करताना सिद्धावस्था प्राप्त झाल्यावर ज्ञाता व ज्ञान यातील भेदाची जाणीव लयास जाते असे सांगतात पण श्रीकृष्णाने अर्जुनास उपदेश केल्यानंतर त्याच्यात ज्ञाता व ज्ञान यातील जाणीव लयास गेली व सर्वभूताबद्दल समभाव निर्माण झाला असे भगवद्गीतेवरून किंवा महाभारतावरून मुळीच म्हणता यावयाचे नाही. याच्या उलट महाभारतावरून आपणांस असे दिसून येते की सर्वच पांडव हे इतर संसारी माणसासारखेच होते. श्रीकृष्णाच्या उपदेशानंतर अर्जुनास सिद्धावस्था तर प्राप्त झाली नाहीच पण श्रीकृष्णसुद्धा गीतेत स्थितप्रज्ञाची जी लक्षणे सांगितली आहेत त्यानुसार वागताना दिसत नाहीत. त्याचे वागणे निर्विकारी माणसाच्या वागण्याप्रमाणे मुळीच दिसून येत नाही. त्यांच्यात सुखदुःख मानअपमान इ. कल्पना इतरासारख्याच आहेत.

अशा परिस्थितीत व्यासांनी श्रीकृष्णास अवतारी पुरुष ठरविले त्यात काही चूक झाली की सिद्धावस्था प्राप्त झालेल्या स्थितप्रज्ञाची लक्षणे सांगताना चूक झाली अशी शंका मनात येते व व्यासानी आपल्या ग्रंथरचनेत ठिकठिकाणी जे भ्रम ( fiction ) निर्माण केले त्यापैकी तर हा भ्रम नाहीना असे वाटावयास लागते. याची चर्चा आपण पुढे करणारच आहो.

दुसरी गोष्ट अशी की व्यास व टिळक यांनी सांख्ययोगाप्रमाणेच कर्मनिष्ठा मोक्षकारक आहे असे म्हटले असले तरी मोक्ष ही स्थिती कोणत्या स्वरूपाची आहे, मोक्षप्राप्तीसाठी कर्मयोगाद्वारे जीवनयात्रा कंठत असता व्यक्तीत कसकसा फरक पडतो याचे विवेचन त्यानी किंवा इतरांनी केलेले नाही, उलट गीतेत श्रीकृष्णाने अर्जुनास जो उपदेश केला असे दर्शविले आहे त्यात त्या काळी अस्तित्वात असलेल्या आत्मा व परमात्मा यासंबंधीचे ज्ञान ग्रंथित झालेले असले व काही बाबतीत व्यासानी आपल्या प्रतिभेने त्या काळच्या समाजात स्थैर्य स्थापन व्हावे या धोरणाने काही नवीन विचार मांडले असले तरी त्यात श्रीकृष्णाचा रोख अर्जुनास युद्धासाठी प्रवृत्त करावे एवढाच होता असे वाटते. युद्धाच्यावेळी अर्जुन गोंधळलेल्या स्थितीत होता. त्याला मानसिक आधार हवा होता, व श्रीकृष्णानी निरनिराळ्या रीतीने त्याचे क्षुब्ध मन शांत करून त्याला मानसिक आधार दिला हे स्पष्ट दिसते. यासाठी उपदेश करताना त्यांनी त्यात



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्या काळी अस्तित्वात असलेल्या कल्पना आपल्या तत्वज्ञानाच्या अभ्यासाची जोड देऊन शिकविल्या. व्यासांच्या कृतीचा एवढाच अर्थ दिसतो. त्या कल्पनांचे सत्यासत्य आपणांस व्यासांचा शब्द प्रमाण म्हणून स्वीकारून ठरविता येणार नाही. त्या कल्पनांचे सत्यत्व प्रत्यक्ष अनुभवाने व प्रयोगानेच तपासून पाहिले पाहिजे.

ज्ञानाचे स्वरूप

गीतेच्या अभ्यासावरून ज्ञान एकाच प्रकारचे आहे. जे ज्ञान व्यवहारासाठी उपयोगी पडते तेच मोक्षप्राप्तीसाठीही उपयोगी आहे असे दिसते. कर्मयोगाने जे ज्ञान प्राप्त होऊ शकते तेच ज्ञान सांख्ययोगाने प्राप्त होते असे भगवद्गीता सांगते. परंतु मुण्डक उपनिषदाकडे दृष्टी टाकली तर ज्ञान परा व अपरा अशा दोन प्रकारचे आहे असे दिसून येते. वेद, यज्ञादि कर्मे, व्याकरण, भाषाशास्त्र इत्यादिकांच्या ज्ञानास अपरा ज्ञान ही संज्ञा असून ज्यामुळे अज्ञानाची प्राप्ती होते अशा उच्च प्रकारच्या ज्ञानास परा असे नाव दिले आहे. हे उच्च प्रकारचे ज्ञान शाब्दिक ज्ञान असूच शकत नाही. ज्याच्यामुळे व्यक्तीत आमूलाग्र परिवर्तन होऊ शकते असे हे ज्ञान आहे. ईशावास्य उपनिषदात आपल्या भौतिक जगाच्या ज्ञानास अज्ञान म्हणून संबोधिले आहे व या ज्ञानातच गढून राहिल्याने मनुष्य अज्ञानांत शिरतो असे म्हटले आहे पण ज्या ज्ञानामुळे व्यक्ती स्वतःत भूतमात्राला पाहाते सर्व भूतात स्वतःला पाहाते ते खरे ज्ञान होय असे म्हटले आहे. जे अशा ज्ञानात आनंद मानतात त्यांना आपण अधिकाधिक अंधकारात प्रवेश करीत आहो असा भास होतो. याचा अर्थ असा की परस्परात विसंवाद निर्माण करणारे ज्ञान वेगळे व जेणेकरून परस्परातील विसंवाद नष्ट होऊन संवाद प्रस्थापित होईल असे ज्ञान वेगळे. पहिल्यास ज्ञान म्हटले की दुसरे अज्ञानासारखे वाटेल, पहिल्यास अज्ञान म्हटले की दुसऱ्यास ज्ञान म्हटले पाहिजे.

परा ज्ञान प्रत्यक्ष अनुभवानेच प्राप्त होते. त्या ज्ञानाने व्यक्तीत आमूलाग्र बदल होतो. अर्जुनास जे ज्ञान प्राप्त झाले ते केवळ शाब्दिक ज्ञान होते. सत्य-ज्ञानासाठी व्यक्तीस शब्दाच्या पलिकडे जाता आले पाहिजे. अर्जुनाचे ज्ञान शाब्दिक होते म्हणून श्रीकृष्णाच्या उपदेशानंतरही त्याच्या मुळच्या स्वभावात मुळीच फरक पडला नाही.

गीतेत सर्वहितसमभाव हा शब्द आला आहे त्यांचा अर्थ काय होतो याचा आपण विचार करू. सर्वहितसमभाव म्हणजे सर्वांना समान लेखणे. सर्वहितसमभाव निर्माण होण्यासाठी भावनात फरक पडणे आवश्यक असते. सामान्यपणे बहुसंख्य माणसांच्या भावना आकुंचित असतात त्या विकसित होणे,

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

व वसुधैव कुटुंबकम् याची जाणीव होणे हेच माणसाच्या ज्ञानप्राप्तीचे गमक आहे. ह्याप्रकारचे ज्ञान प्राप्त झालेली व्यक्ती आपल्या पूर्वीच्या आकुंचित भावनेवर आधारित जी काही कर्मे असतील ती सोडून देऊन तिला प्राप्त झालेल्या विशाल दृष्टिकोनावर आधारित अशी कर्मे करील हे उघड आहे. गीतेत ज्ञानाने कर्मे गळतात असे जे म्हटले आहे त्याचे महत्त्व येथे स्पष्ट होते. ही गोष्ट लक्षात घेतली तर योग्य ज्ञान कोणते ह्याची काही कल्पना आपल्यास येऊ शकते.

येथे ज्ञानाचे जे दोन प्रकार उपनिषदात वर्णिले आहेत त्याची आठवण झाल्याशिवाय राहात नाही: अपरा ज्ञान म्हणजे आपल्या भोवतालच्या वस्तू व कल्पना यासंबंधीचे ज्ञान. ह्या ज्ञानामुळे व्यक्तीत स्थानिक जाणीव (Local consciousness) निर्माण होते. हे ज्ञान कायम असताना मनुष्य जमीन वस्तु पैसा सत्ता इत्यादिकास समूहाने दिलेली मूल्ये स्वीकारतो व तीच मूल्ये खरी आहेत असे समजतो. त्याच्या क्रिया त्याच्या या स्थानिक जाणिवेवर आधारलेल्या असतात. याच्या उलट पराज्ञान प्राप्त झाले म्हणजे व्यक्तीत आमूलाग्र बदल होतो. हे ज्ञान प्राप्त झाल्यावर व्यक्ती स्वतःत भूतमात्र पाहते व सर्व भूतात स्वतःला पाहाते. हे ज्ञान प्राप्त झाल्यावर व्यक्तीची स्थानिक जाणीव नष्ट होते व जीवनासंबंधीची विशाल जाणीव निर्माण होते. जीवनासंबंधीच्या ह्या दोन जाणिवा परस्पराहून अगदीच भिन्न आहेत. जेथे भूमी पैसा सत्ता याविषयीची आसक्ती नष्ट झाली तेथेच सर्व भूतात स्वतःला पाहाण्याची जाणीव निर्माण होऊ शकेल व त्या परिस्थितीत पूर्वीच्या मर्यादित जाणिवेवर आधारित क्रिया गळून पडतील अशी जाणीव ज्या माणसात निर्माण होईल त्याला आपण अधिकाधिक अंधकारात प्रवेश करतो असे वाटेल. कारण अशी जाणीव जसजशी माणसात निर्माण होते तसतसे त्याला आपणास ज्याचे पूर्वज्ञान नाही अशा नवीन जाणिवेत प्रवेश करीत आहे असे स्पष्ट दिसून येते. वास्तविकपणे तो प्रकाशात प्रवेश करीत असतो पण ही नवीन जाणीव प्राप्त करण्यासाठी त्याला आपली पूर्वीची स्थानिक जाणीव सोडून द्यावी लागते व अज्ञाताच्या प्रदेशातून प्रवास करावा लागतो. वास्तविकपणे भूमी पैसा मान व इतर इंद्रियसुखाबद्दल आसक्ती दृढ करणारी स्थानिक जाणीव हेच आपले अज्ञान होय. पण त्यासच आपण ज्ञान असे नाव देतो अशा या ज्ञानात गढून राहिलेला मनुष्य अज्ञानात प्रवेश करतो असे ईशावास्य उपनिषदात म्हटले आहे.

व्यासानी निष्कामकर्म या शब्दाचा संकुचित अर्थ केला व ज्ञानाचे परा व अपरा हे त्याकाळी अस्तित्वात असलेले भेद लक्षात न घेताच ज्ञान एकाच



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रकारचे आहे असे कल्पून कर्म करीत असता माणसात उच्च प्रकारचे ज्ञान प्राप्त होते असे मानले ही गोष्ट आपण पाहिली. आता भगवद्गीतेत आलेल्या नैष्कर्मसिद्धीच्या कल्पनेकडे आपण वळू.

व्यासानी नैष्कर्मसिद्धी कशास म्हणावे ते सांगितले नाही. भगवद्गीतेत हा शब्द आला आहे त्यावरून सतत कर्म करीत राहिल्याने कर्माबद्दल नावड निर्माण होण्याची स्थिती असा या शब्दाचा अर्थ करता येईल, असा अर्थ करण्यास मानसशास्त्राचा आधार मिळतो. तेच ते कर्म सतत करीत गेले असता कालांतराने त्याच्याबद्दल नावड निर्माण होते. व ते काम करण्यास प्रवृत्त करणारी इच्छा दुर्बल होऊन ती नष्ट होते. तेच ते काम करणे उद्वेगकारक असते. म्हणूनच आपण आपल्या कामात नाविन्याची अपेक्षा करीत असतो. शिवाय काम करीत असताना येणाऱ्या अडचणीमुळे मन उद्विग्न होते व ते काम टाकून द्यावेसे वाटते. या रीतीने काम करीत गेले असता व्यक्तीची ते काम करण्याची आस्था हळूहळू नाहिशी होते. त्या विशिष्ट कामात येणाऱ्या अडचणीमुळे व त्यात येणाऱ्या अपयशामुळे व्यक्तीला ते काम त्यागावे असे वाटते एखादी व्यक्ती यशापयशाचा विचार न करता निष्काम वृत्तीने ते काम करते असे गृहीत धरले तरी त्या व्यक्तीची ते काम करीत राहाण्याची इच्छा नष्ट होते. काम करण्यास प्रवृत्त करणारी प्रेरणाच नष्ट होते ही स्थिती प्राप्त झाली म्हणजे त्याच्या पूर्वीच्या आवडीनिवडी बदलतात, त्याच्या मूल्यमापनाच्या वृत्तीत बदल होतो; व त्याच्या स्वभावातही बदल होतो.

एखादे काम सतत करीत गेले असता त्याची आवड पुढे नष्ट होते हे मानसशास्त्रातील अनेक उदाहरणाने दाखविता येते.

अशी कल्पना करा की एका लहान मुलाला माचीसच्या डबीशी खेळण्याची भारी हौस आहे. पण त्या मुलाच्या हातात माचीसची डबी दिली तर तो त्यातील काडया पेटवील व कदाचित त्यामुळे भाजून निघेल अशी भीती घरच्या लोकास वाटते म्हणून ते त्या मुलाला माचीसशी खेळू देत नाहीत. पण त्या मुलाची माचीस हाताळण्याची आवड त्यामुळे कमी न होता उलट वाढतच जाते. अशा स्थितीत घरच्या लोकानी त्या मुलाला जर इतर खेळाप्रमाणे माचीसशी खेळू दिले पण याने माचीसच्या काडीमुळे तो आपले हात किंवा इतर वस्तू जाळणार नाही याची दक्षता घेतली तर अशा रीतीने माचीसशी खेळल्यावर माचीसबद्दल असलेली त्या मुलाची ओढ हळहळू कमी होईल. कालांतराने त्याची इच्छा पूर्णपणे गळून पडेल त्याची आवड विस्तृत होईल व माचीसच्या बाबतीत त्याला नैष्कर्म्यसिद्धी प्राप्त होईल.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कर्माचे सातत्य नष्ट होऊ शकते हे स्पष्ट करणारी विधाने गीतेतच आहेत. ज्ञानाग्नी सर्व कर्मे नष्ट करतो असा तेथे उल्लेख आहे. (गी. ४, ३७) याचा अर्थ कर्मामुळे ज्ञान प्राप्त होते असा नसून ज्ञान प्राप्त झाले असता कर्मे गळून पडतात असा त्याचा अर्थ आहे. ज्यास तात्कालिक वैराग्य प्राप्त झाले आहे किंवा ज्यांनी मोक्षप्राप्तीच्या लोभाने संन्यासवृत्ती स्वीकारली आहे असे लोक या विधानाकडे बोट दाखवून संसारनिवृत्ती इष्ट आहे असे म्हणतील. पण अर्थातच या विधानाचा अर्थ ज्ञान प्राप्त झाल्यावर कर्मे गळून पडतात असा असून ज्यास ज्ञान प्राप्त झाले नाही त्याने पुढे आपणास ज्ञानप्राप्ती होईल अशा समजुतीने कर्मसंन्यास घ्यावा असा नाही हे उघड आहे. लोकमान्य टिळकांचे हे विधान त्याच्या विचाराच्या चौकटीत बसत नाही म्हणून त्याकडे सोईस्करपणे दुर्लक्ष केलेले आहे असे दिसते.

ज्ञानप्राप्ती झाल्यावर कर्मे गळून पडत असतील तर ते ज्ञान कोणत्या प्रकारचे असावे हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. केवळ शाब्दिक ज्ञान झाल्यामुळे कर्मे गळून पडत नाहीत हे उघड आहे. ज्या ज्ञानाने कर्मे गळून पडतात ते ज्ञान आपल्या मूल्यात परिवर्तन घडवून आणणारे असले पाहिजे. ज्या ज्ञानाने मूल्यपरिवर्तन होत नाही त्याने कर्मे गळून पडत नाहीत.

हा मुद्दा स्पष्ट करण्यासाठी आपण आपल्या विधवाविवाहाच्या प्रथेचा विचार करू. पूर्वी समाजाची विधवाकडे पाहण्याची आकुंचित दृष्टी होती. धर्माच्या नांवावर समाज विधवाचा छळ करीत असे. विधवांनी केशवपन करावे. पुन: लग्न करू नये व आजन्म अविवाहित राहून वर्तमानकाळात सामान्यास उपलब्ध असलेल्या भौतिक लाभाकडे दुर्लक्ष करावे अशी अपेक्षा त्यांच्याकडून करण्यात येई. आता सामाजिक दृष्टिकोन बदलल्यामुळे विधवास क्रूरतेने वागविण्याची ही रुढी नष्ट होऊ पाहत आहे. लोकात मूल्यपरिवर्तन होत आहे. त्यांना मानवतेची मूल्ये ओळखता येऊ लागली आहेत म्हणून विधवाना निर्दयतेची वागणूक देण्याची रूढी बंद होऊ पाहात आहे.

आपल्या हेतूमध्ये बदल झाल्याने आपली कर्मे गळून पडतात. आपण ज्या गोष्टीस महत्व दिले किंवा ज्यास आपण मूल्य म्हणून स्वीकारले त्या मूल्यासाठी कृती करण्याकडे आपली प्रवृत्ती असते. आपली कर्मे त्या मूल्यावर अधिष्ठित असतात व त्याच्यानुसार आपण कर्मे करीत असतो. पण पुढे जे मूल्य पूर्वी इष्ट म्हणून स्वीकारले त्यात दोष आहेत हे अनुभवाने आढळून आल्यावर आपण त्यास जे अवास्तव महत्व दिले ते सोडून देणे. मूल्यासंबंधीचे जे ज्ञान आपणास प्राप्त झालेले असते त्यामुळे आपल्या दृष्टिकोनात बदल होतो.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मूल्यपरिवर्तन ही केवळ विचाराची, विचाराने साध्य होणारी क्रिया आहे असे नाही. योग्य ज्ञानाने माणसाच्या भावनेतही बदल होऊ शकतो. असे झाले म्हणजे आपण पूर्वीची कर्मे करणे सोडून देतो व मूल्यपरिवर्तनानंतर आपली कर्मे नवीन जाणिवेप्रमाणे करू लागतो.

वरील मुद्दे लक्षात घेतले असता लोकमान्य टिळकांनी गीतारहस्यात अर्जुनास श्रीकृष्णानी युद्ध करावे किंवा करू नये यासंबंधीचे मार्गदर्शन केल्यावर अर्जुनास सिद्धावस्था प्राप्त झाली व त्याच्यासमोर या सिद्धावस्थेनंतर त्याने नंतर कर्मे करावी किंवा कर्मसंन्यास घ्यावा एवढाच प्रश्न शिल्लक राहिला असे जे म्हटले आहे ते चुकीचे आहे हे उघड आहे. अर्जुनास युद्धाच्या वेळी जे ज्ञान प्राप्त झाले होते ते केवळ शाब्दिक ज्ञान होते या प्रसंगी श्रीकृष्णाने अर्जुनास निष्काम कर्म करण्याचा तो उपदेश केला असला तरी या प्रकारचे निष्कामकर्म व्यक्तीला स्वावलंबी, स्वतंत्र व वस्तुनिष्ठ बनवू शकत नाही इतकेच नव्हे तर ते माणसाला विचारहीन व परावलंबी बनविणारे असते.

आतापर्यंत आपण निष्काम कर्म, ज्ञान व नैष्कर्म्यसिद्धी या शब्दांचे अर्थ तपासले. त्यावरून हे तीनही शब्द कर्मसातत्याच्या सिद्धान्तास विरोध दर्शविणारे आहेत हे आपणास दिसून येते. अनासक्तीशिवाय निष्काम कर्म शक्य नाही, व्यक्ती खऱ्या अर्थाने अनासक्त असल्याशिवाय ती वस्तुनिष्ठतेने कोणत्याही गोष्टीकडे पाहू शकत नाही. सत्यासत्याचा शोध करू शकत नाही व म्हणून ज्ञानही प्राप्त करू शकत नाही. अशा स्थितीत तिला कोणत्याही प्रकारचे स्वातंत्र्य मिळू शकत नाही. पण व्यक्ती स्वतंत्रतेने निष्कामवृत्तीने वागणारी असेल तर ती कोणत्याही स्थिर विचारास किंवा स्थिर कर्मास चिकटून राहणार नाही. ती सत्यान्वेशी बनेल व जसजसे तिला सत्य गवसेल तसतशी तिची अज्ञानावर आधारलेली कर्मे गळून पडतील व ती खऱ्या अर्थाने स्वतंत्रपणे वागू शकेल.

### श्रीकृष्ण सिद्धपुरुष होते काय ?

कर्मसातत्याच्या सिद्धान्ताचे इतके विवेचन केल्यावर आपण पुनः एकदा महाभारतात व भगवद्गीतेत श्रीकृष्णास जे विभूतिमत्त्व बहाल केले आहे त्या विषयासंबंधी चर्चा करू. यापूर्वी अर्जुन निष्कामवृत्तीने वागणारा नव्हता इतकेच नव्हे तर श्रीकृष्णाचे वर्तनही निष्काम वृत्तीचे नव्हते ह्या मुद्याचा उल्लेख आम्ही केला आहे. महाभारतात किंवा गीतेत श्रीकृष्णाचे वागणे सामान्य माणसापेक्षा भिन्न कसे होते ते सांगितले नाही. अर्थात सिद्धावस्था प्राप्त


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

झालेल्या व्यक्तीने लोकसंग्रह करावा असे गीतेत जे म्हटले आहे त्यात गैर असे काहीच नाही. सिद्धावस्था प्राप्त झालेली व्यक्ती इतरांस उपदेश करू लागली व तसे करीत असताना लोकसंग्रह करू लागली तर ती इष्ट व आवश्यक गोष्ट आहे पण अशी व्यक्ती युद्धात भाग घेईल काय ? प्रस्थापित समाजमूल्येच सर्वश्रेष्ठ आहेत. असा प्रचार ती करील काय ? व त्या समाज-रचनेस विरोध करणाऱ्या लोकांचा निःपात करण्याचा प्रयत्न करील काय हा महत्वाचा प्रश्न आहे. आपण जगाकडे दृष्टिक्षेप केला असता जगात मानव-जातीचे सर्वश्रेष्ठ शिक्षक होऊन गेले त्यानी युद्धाचा प्रचार केला नाही. किंवा प्रस्थापित मूल्यास उचलून धरले नाही. तर त्यानी आपल्या क्रान्तीकारक शिकवणुकीमुळे जगात नवीन मूल्ये प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला असे आपणास दिसून येते. व येथे तर श्रीकृष्ण केवळ प्रस्थापित समाजरचनेच्या समर्थनार्थ धडपडत आहेत. युद्धात यश प्राप्त व्हावे म्हणून इतरास युद्ध करावयास सांगत आहेत. ते पांडवानी ज्या चुका केल्या त्याबद्दल चिंता वाहातात व पांडवास यश प्राप्त व्हावे म्हणून त्यांना निरनिराळ्या क्लुप्त्या करावयास सांगतात. इतकेच नव्हे तर बभ्रुवाहन, जयद्रथ, जरासंध यांच्या बाबतीत स्वतःच कपटाचा वापर करतात यावरून त्याचे वर्तन एखाद्या दैवी पुरुषासारखे किंवा ईश्वरासारखे नसून एखाद्या व्यवहारदक्ष पुरुषासारखे आहे असे स्पष्ट दिसते. श्रीकृष्ण जर ईश्वरस्वरूप असते किंवा प्रत्यक्ष ईश्वर असते तर त्यांनी युद्धाच्या वेळी अर्जुनास 'मी ह्या लोकास अगोदरच मारले आहे तू केवळ निमित्तमात्र हो' असे म्हटले नसते. श्रीकृष्णानी या सर्व लोकांस अगोदरच मारले असते तर मग अर्जुनास युद्ध कर म्हणून सांगण्याची गरजच उरली नसती. श्रीकृष्णाला भूत, वर्तमान व भविष्य समजले असते व अर्जुन किंवा इतर कोणीही या युद्धात केवळ निमित्तमात्र होणार असता तर मग त्यांनी युद्ध सुरू होण्याचे अगोदर धृतराष्ट्राकडे जाऊन शिष्टाई तरी का केली ? ईश्वरतुल्य माणसात युद्धाच्या निरनिराळ्या प्रसंगी चिंता वाहण्याची व युद्धात यश मिळविण्यासाठी निरनिराळ्या क्लुप्त्या करण्याची गरज का भासावी ? श्रीकृष्णाची ही कर्मे निष्काम कर्मयोग्याची कर्मे नाहीत हे तेव्हाच दिसून येते.

भगवद्गीतेत स्थितप्रज्ञाची लक्षणे सांगितली आहेत. त्यावरून स्थितप्रज्ञ सर्व यशापयश, सुखदुःख मानापमान अशा द्वंद्वापासून मुक्त असून स्वातंत्र्याचे जीवन जगतो असे दिसते. पण श्रीकृष्णाचे वर्तन या प्रकारचे नाही. श्रीकृष्ण आपल्या सभोवतालच्या सामाजिक मूल्याशी समरस होतात. ते युद्धात

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

यशप्राप्तीसाठी धडपडतात. त्यांना युद्धात यश व अपयश सारखे वाटत नाही. मान व अपमानास ते सारखीच किंमत देत नाहीत. युधिष्ठिराने केलेल्या अश्वमेधाच्या वेळी शिशुपालाने त्याचा अपमान केला असता ते त्याचा शिरच्छेद करतात. श्रीकृष्ण अनासक्त नाहीत त्याचे अर्जुनावर विशेष प्रेम आहे. म्हणून ते आसक्ती विरहित प्रीतिद्वेशरहित आहेत असे म्हणता येत नाही. स्थितप्रज्ञाच्या वासना नष्ट झालेल्या असतात. श्रीकृष्णाच्या सर्व वासना नष्ट झाल्या होत्या असा पुरावा नाही. याच्या उलट त्यांना विषयाची आवड होती असे महाभारतातील पुराव्यावरून सिद्ध करता येते.

एखादी व्यक्ती अल्प प्रमाणात जरी अनासक्त असली तरी ती भोवतालच्या सामाजिक मूल्याशी समरस होत नाही असे आपणास व्यवहारात दिसून येते. अशी व्यक्ती लोकसंग्रह करणारी असते किंवा नसते. अनेकदा ती समाजात नवीन मूल्याची स्थापना करण्यासाठी धडपडते. तिचे व्यवहारातील वर्तन त्या मूल्याशी सुसंगत असते. पण येथे श्रीकृष्ण नवीन सामाजिक मूल्ये प्रस्थापित करतात असे दिसत नाही. ते स्थितप्रज्ञाची लक्षणे कशी असतात ते सांगतात; पण त्यांचे वर्तन स्थितप्रज्ञाच्या लक्षणाशी जुळत नाही. प्रकृतीच्या गुणांनी वेडावलेल्या लोकास उपदेश करू नये असेही ते सांगतात. फक्त युद्धाच्यावेळी त्यांनी अर्जुनास उपदेश केलेला आहे. काही विशिष्ट सामाजिक किंवा धार्मिक उद्दिष्ट नजरेसमोर ठेवून त्यासाठी ते जन्मभर धडपडले असेही त्याच्या चरित्रावरून दिसून येत नाही.

वरील गोष्टीचा विचार केल्यास श्रीकृष्णाचे एकंदर व्यवहार सिद्ध ज्ञानी पुरुषाच्या वर्तनाशी जुळण्यासारखे नाहीत हे स्पष्ट दिसते. ज्ञानी पुरुषाने लोकसंग्रह करावा व तो आपल्या विशिष्ट उच्च भूमिकेवरून. त्याला युद्धात भाग घेण्याची आवश्यकता कोणती ? सामान्य माणसे युद्धात भाग घेतात ते युद्धाने त्याच्या प्रश्नाचे निर्णय लागतात म्हणून नव्हे (युद्धात यश मिळेलच हे निश्चित नसते ) तर आपले प्रश्न सोडविण्यास युद्धाशिवाय दुसरा पर्याय त्यांना दिसत नाही म्हणून ते युद्ध करण्यास प्रवृत्त होतात. सामान्य माणसे सत्यान्वेशी नसतात. आपल्या अडचणीचे रूढ मार्गाने निरसन करणे एवढेच त्यांना समजते. युद्ध म्हणजे आपल्या ज्वलंत प्रश्नाची आपल्यास हवी असलेली उत्तरे रूढ मार्गाने सोडविण्याचा एक प्रकार. यामुळे आपले उद्दिष्ट साध्य होतेच असे नाही. ही गोष्ट लक्षात घेतल्यावर श्रीकृष्णासारख्या सिद्ध ज्ञानी पुरुषास युद्ध करण्याची आवश्यकता का वाटावी ? व ही गोष्ट गीतेत चर्चिलेल्या अद्वैताच्या तत्वज्ञानात कशी काय बसते ? बरे यावेळी युद्ध करणे आवश्यक होते असे जरी आपण



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मानले तरी श्रीकृष्णासारख्या ईश्वरी माणसाने युद्धात भाग का घ्यावा व आपले सैन्य विरोधी पक्षाकडे का पाठवावे ? ज्याचे ज्ञान राजस आहे तो सर्व भूतात भिन्नभिन्न भाव पाहातो अशा लोकानी युद्ध केले तर ते समजण्यासारखे आहे. पण श्रीकृष्णासारखी व्यक्ती जर सर्व भूताकडे समत्वाच्या भावनेने पाहात असेल तर अशा व्यक्तीस युद्ध करण्याची किंवा एखाद्या गटास मिळून काम करण्याची आवश्यकता का वाटावी ?

पण व्यासाला समाजास एका स्थिर चौकटीत बसवावयाचे होते यासाठी त्यांना आपल्या विचारास प्रतिष्ठा प्राप्त करून द्यावयाची होती ही गोष्ट आपण लक्षात घेतली तर व्यासानी श्रीकृष्णास देवत्व का बहाल केले याचे स्पष्टीकरण मिळते. व्यासाच्या वेळी चातुर्वर्ण्याची परंपरा निर्माण होण्यास सुरवात झाली होती व श्रीकृष्ण या परंपरेत रुळलेले मुत्सद्दी होते. हाती घेतलेल्या कामात यश प्राप्त करण्याचे कौशल्य त्याला साधले होते. यामुळे त्याच्या हयातीतच त्याला महत्व प्राप्त झाले होते. व्यास श्रीकृष्णास मानणारे होतेच. आपल्या कल्पनांच्या बळकटीसाठी त्यांनी श्रीकृष्णास देवत्व बहाल केले. त्यांना जे विचार समाजाच्या गळी उतरवावयाचे होते ते त्यांनी श्रीकृष्णाच्या तोंडी घातले व महाभारत या ग्रंथास वेदासारखी प्रतिष्ठा मिळवून दिली. पण त्याच्या या उद्योगामुळेच इष्ट कोणते व अनिष्ट कोणते याचा विवेक जनमानसातून नष्ट होऊन संस्कृतीला साचेबंद स्वरूप आले व पुढील विकास खुंटला हे यापुढील विवेचनाने वाचकांच्या लक्षात येईल.

असो. आताचा काळ बदललेला आहे. अलीकडील संशोधनावरून श्रीकृष्ण ईश्वर नसून मानव होता हे मत आता सर्वमान्य होऊ पाहात आहे. ह्या मतास महाभारताचा व त्याच्यानंतरच्या अन्य ग्रंथांचा ज्यानी चिकित्सक दृष्टीने अभ्यास केला आहे अशा अनेक संशोधकांकडून पुष्टीच मिळत आहे. याशिवाय पुराणे व बौद्ध व जैन यांच्या ग्रंथांवरून श्रीकृष्ण मनुष्य होता हे दिसून येते. प्रत्यक्ष महाभारताच्या अभ्यासावरूनही ही गोष्ट सिद्ध होते. श्रीकृष्णाच्या कर्तृत्वाबद्दल ज्यांनी संशोधन केले अशा संशोधकात भांडारकर, गाब, ग्रीअरसन, राय चौधरी, सील इ. पौर्वात्य व पाश्चिमात्य विद्वानांचा समावेश होतो. या विद्वानांनी महाभारताच्या कथेवरूनही श्रीकृष्ण मानव होता हे दाखविले आहे. महाभारताचा अभ्यास केला असता महाभारतात श्रीकृष्णाचे मानवी व दैवी असे दोन्ही प्रकारचे गुण चित्रित करणारी वर्णने आढळतात. भीष्म, नारद यासारखे मान्यवर लोक त्यांच्या समकालीन होते.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

या लोकास श्रीकृष्णात काही दैवी गुण आहेत असे वाटत असले तरी शिशुपाल, दुर्योधन वगैरे काही दुसऱ्या समकालीन लोकास तो सामान्य मनुष्य आहे असेच वाटत होते. श्री. पुसाळकर यांच्या मते श्रीकृष्णास क्रमाक्रमाने देवत्व कसे प्राप्त झाले याचा पुरावा प्रत्यक्ष महाभारतातच मिळतो. त्यांच्या मते महाभारताच्या सुरवातीच्या भागात श्रीकृष्ण इतरांप्रमाणे मनुष्य आहे असे दाखविले आहे, त्याच्या पुढील भागात तो दैवीगुणसंपन्न आहे असे दाखविले असून त्याच्या अंतिम भागात तो परमेश्वर आहे असे मानले आहे. व्यासांनी भारतग्रंथ रचला त्यावेळी त्यांनी श्रीकृष्ण दैवीगुणसंपन्न मनुष्य असला तरी त्याच्यात मानवी दौर्बल्याची अनेक चिन्हे आहेत असे समजून ग्रंथरचना केली असावी. यानंतरच्या काळात लोक श्रीकृष्णास भजू लागल्यावर श्रीकृष्णाचे मनुष्यपण दाखविणारा भाग कमी करून त्याचे ईश्वरत्व प्रगट करणारा भाग वाढविला गेला असावा. या काळात बौद्ध व जैन धर्माचा विकास झाला व वैराग्यपर तत्त्वज्ञानास महत्त्व येऊ लागले. या हिंदू विरोधी तत्त्वज्ञानास शह देण्यासाठी लोमहर्षणाने मूळ ग्रंथात त्या काळी प्रचलित असलेल्या कथांची फारच मोठ्या प्रमाणात भर घातली व ग्रंथाचा पगडा भाविक लोकांच्या मनावर चिरंतन राहावा अशी व्यवस्था केली. लोमहर्षणाच्या कृतीचा त्याला हवा असलेला परिणाम झाला. त्याच्या काळापासून श्रीकृष्णास मोठ्या प्रमाणावर भजणे सुरू झाले व महाभारतातील प्रत्येक वाक्य अपौरुषेय आहे असे जनता मानू लागली.

असो. महाभारत ग्रंथ रचण्यामागील व्यासाचा हेतु व त्यानंतरच्या काळात या ग्रंथात मधून मधून जे फेरफार करण्यात आले त्याची कारणे लक्षात घेतली तर महाभारताची घडण ज्या विशिष्ट तऱ्हेने का झाली ह्याबद्दल दृष्टी प्राप्त होते, व मग ज्यात शाश्वत कल्पना आहेत असा हा ग्रंथ नसून त्यातील कल्पना त्या विशिष्ट काळास अनुसरून आहेत, त्या नसून सापेक्ष आहेत ही गोष्ट समजून येते. अर्थात या ग्रंथातील सर्वच कल्पना अशाश्वत किंवा क्षणिक महत्त्वाच्या आहेत असे नाही. व्यासानी आपल्या काळी या ग्रंथाची रचना करताना त्यात काही चिरकालीन महत्त्वाच्या ठरतील अशा कल्पनांचाही समावेश केला होता असे दिसते असे असले तरी महाभारतातील विचार सलग पण परस्परसंबंधित नसून परस्पर विरोधीही आहेत ही गोष्ट आपण लक्षात घेतली पाहिजे. महाभारत परस्पर विरोधी विचारांची बनलेली एक गोधडी आहे व हीच गोष्ट कमी अधिक प्रमाणात भगवद्गीतेतील कल्पनाना लागू पडणारी आहे. ही गोष्ट लक्षात घेतली तर या ग्रंथातील कल्पनासंबंधी लोकामध्ये जे भ्रम पसरलेले आहेत ते नष्ट होण्यास मदत होऊ शकेल.

◆ ◆ ◆

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. ना. रा. दुंडगेकर

# शोकनाट्याची कथावस्तू

पाश्चिमात्य टीकाशास्त्राच्या इतिहासात ॲरिस्टॉटलच्या 'काव्यशास्त्र' या ग्रंथास मानाचे पान अर्पण करण्यात आले आहे. कलेच्या विविध अंगांची मूलगामी चर्चा त्याने या ग्रंथात केली आहे. या ग्रंथाच्या सहाव्या भागात शोकनाट्याची व्याख्या केल्यानंतर शोकनाट्यास आवश्यक असणाऱ्या अंगाचा सांगोपांग विचार त्याने केला आहे. त्याच्या मते कथानक, स्वभाव, शब्दयोजना, विचार दृश्य व गीत ही सहा अंगे शोकनाट्यासाठी आवश्यक आहेत. या सहा अंगापैकी कथानकाला तो सर्वप्रथम स्थान देतो.

ॲरिस्टॉटलच्या मते शोकनाट्य ही व्यक्तीची अनुकृती नसून एका कर्माची व जीवनाची अनुकृती असते; आणि जीवन कर्मरूप असते. शोकनाट्याचे उद्दिष्ट कर्माची एक पद्धती दाखविणे हे असते, गुण दाखविणे नव्हे. स्वभाव हा मनुष्याचे गुण दाखवितो. पण तो सुखी असणे अगर त्याविरुद्ध असणे हे त्याच्या कर्मावरून ठरते. म्हणून नाट्यात्मक कर्मामागील हेतू स्वभावदर्शन हा नसतो, स्वभावाचा प्रवेश कर्माचा साहाय्यकारी म्हणूनच होतो. प्रसंग आणि कथानक हेच शोकनाट्याचे साध्य असते; आणि साध्य ही सर्वात महत्त्वाची गोष्ट होय. शिवाय कर्मावाचून शोकनाट्य घडणे शक्य नाही; स्वभावावाचून घडणे शक्य आहे. असे प्रतिपादन केल्यावर तो ठामपणे म्हणतो :

"We maintain, therefore, that the first essential the life and soul, So to speak, of Tragedy is the plot; and that the characters come second." [१]

---

1. Aristotle on the art of poetry: translated by Ingram Bywator, Oxford University Press, Reprinted (1967) Page, 38.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कथानक हा शोकनाटयाचा आत्मा आहे; स्वभावदर्शनावाचून शोकनाटय असू शकेल, पण कथानकाशिवाय त्याचे अस्तित्वच अशक्य आहे अशी ठाम विधाने करून कोणतीही असंदिग्धता न ठेवता कथानकाचे महत्त्व तो सांगतो.

आधुनिक टीकाशास्त्राला मात्र ॲरिस्टॉटलची विधाने खटकतात. आधुनिक टीकाकारांच्या मते कथानकापेक्षा नायकाला महत्त्व असून तोच शोकनाटयाचा प्रधान घटक असतो. संपूर्ण शोकनाटयावर त्याचेच प्रभुत्व असून कथानकाला दुय्यम स्थान असते. परंतु ॲरिस्टॉटलला अभिप्रेत असलेले कथानक व स्वभाव या शब्दांचे अर्थही समजावून घेणे उचित होईल. त्याने शोकनाटयात 'कथानक' हा योजलेला शब्द प्रत्यक्ष जीवनाच्या संदर्भात वापरलेल्या 'कर्म' या शब्दाशी समांतर आहे. त्याची कर्माची कल्पना व्यापक आहे. कर्मामध्ये केवळ बाह्यप्रसंगच येतात असे नसून प्रसंगात परिणत होणाऱ्या आंतरिक प्रेरणाही समाविष्ट होऊ शकतात. "It embraces not only the deeds, the incidents, the situation, but also the mental processes and the motives which underlie the outword events or which result from them." [२] ॲरिस्टॉटलची कथानकाची कल्पना ही अशी व्यापक आहे. तसेच तो ज्याला स्वभाव (ethos) म्हणतो तो स्वभाव सध्याच्या आपल्या स्वभावाच्या कल्पनेपेक्षा भिन्न आहे. स्वभाव या शब्दाने त्याला एक नैतिक वृत्ती सुचवावयाची आहे.

कथानकाचे शोकनाटयातील महत्त्व विषद केल्यानंतर ॲरिस्टॉटल कथानकाची सविस्तर चर्चा करतो. आदर्श कथानकाच्या संदर्भात त्याने खालील मुद्दे मांडले आहेत :

१) कथानकाचे आकारमान सौंदर्य प्रकट करण्यास समर्थ असावे. २) कथानक संपूर्णपणे स्वयंपूर्ण असावे. ३) कथानकाला सजीव एकात्मता असावी. ४) कथानकांतर्गत सर्व घटना म्हणजे प्रारंभानंतरचा सर्व भाग हा अपरिहार्य किंवा संभवनीय अशा कार्यकारण संबंधाने बद्ध झालेला आहे असे वाटावे.

५) कथानकाची रचना करुणा व भीती या भावनांना आवाहन करणारी असावी.

त्याच्यामते आदर्श शोकनाटयात या सर्व गोष्टी अत्यावश्यक आहेत. तसेच प्रेक्षकाला विस्मय वाटेल आणि त्याच्या मनात संदेह निर्माण होईल अशी

2. S. H. Butcher : Aristotle's Theory of Poetry and Fine Art, Indian edition, ( 1968 ) page -- 337.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कथावस्तू असावी. शिवाय त्या कथावस्तूत ज्या घटना असतील त्यातून दैवदुर्विलासाची प्रतीती व्हावी असे तो म्हणतो. प्रतिपादिलेल्या सर्व वैशिष्टयासाठी आदर्श शोकनाटय म्हणून त्याने सफोक्लीज्‌चे 'ईडिपस' हे नाटक निवडले आहे. ते नाटक पहात असताना प्रेक्षकाला अनेक विस्मयाचे धक्के बसतात. ईडिपस हा शोकनाटयाचा नायक सद्‌गुणी असूनही दैवापुढे त्याचे काहीच चालत नाही; त्याला अनंत यातना सहन कराव्या लागतात. संपूर्ण सत्य ज्ञात झाल्यावर तो स्वतःचे डोळे काढून टाकतो. आणि ते पाहून प्रेक्षकांच्या मनात भीती, करुणा यासारख्या भावना निर्माण होतात. दैवदुर्विलासाचे अधिक स्पष्टीकरण करताना ॲरिस्टॉटलने परावृत्ती ( Peripety ) व अभिज्ञान ( Discovery ) या दोन संज्ञा वापरल्या आहेत. ज्या स्थित्यंतरामुळे संभाव्यतेच्या किंवा अपरिहार्यतेच्या नियमानुसार कर्माला विरुद्ध दिशेकडे कलाटणी मिळते. त्या स्थित्यंतराला घटनेची परावृत्ती म्हणतात. उदा० 'ईडिपस' या नाटकामध्ये ईडिपसला उत्साहित करण्यासाठी व त्याच्या आईविषयीच्या आशंकेपासून त्याना मुक्त करण्यासाठी दूत प्रवेश करतो. पण ईडिपस कोण आहे ते उघड करून नेमका विरुद्ध परिणाम घडवून आणतो. अभिज्ञान म्हणजे, त्या शब्दाने सूचित केल्याप्रमाणे, अज्ञानापासून ज्ञानाकडे नेणारे आणि कवीने चांगल्या किंवा वाईट भवितव्यासाठी निश्चित केलेल्या व्यक्तीमध्ये प्रेम किंवा द्वेष निर्माण करणारे स्थित्यंतर होय. दूत आल्यानंतर ईडिपसला मागील सर्व वृत्तान्त कळतो. व त्याला अभिज्ञान होते.

याशिवाय कथानकाच्या रचनेसाठी मार्गदर्शन करणाऱ्या आणखी काही सूचना ॲरिस्टॉटलने केलेल्या आहेत. १) नाटकाचा कालखंड एका दिवसापुरता मर्यादित असावा. २) कथानकाची निवड करताना विशिष्ट घराण्याशी संबंध असलेल्या कर्माना प्राधान्य द्यावे. परंतु ॲरिस्टॉटलनंतर इटालियन टीकाकारांनी ॲरिस्टॉटलच्या काव्यशास्त्राच्या आधाराने तीन तत्त्वे सांगितली आहेत.

१) स्थलैक्य २) कालैक्य ३) कृत्यैक्य.

शोकनाटयाची चर्चा करताना ॲरिस्टॉटलने कथानकावर अशा रीतीने अत्यंत भर दिला असून कथानकाला तो शोकनाटयाचा आत्मा समजतो. कथानक या शब्दाने सूचित केलेली आधुनिक कल्पना व ॲरिस्टॉटलप्रणीत कल्पना यांच्यात जरी फरक असला आणि ॲरिस्टॉटलला अभिप्रेत असलेली कथानकाची कल्पना व्यापक असली तरी त्याने कथानकावर वाजवीपेक्षा जास्त भर दिला असून स्वभावचित्रणाकडे दुर्लक्ष केलेले आहे असे म्हणावे लागेल.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

"सारांश, अॅरिस्टॉटलची स्वभावचित्रणाची कल्पना नुसत्या कथानकाच्या दडपणामुळेच संकुचित झालेली आहे असे नसून ती नैतिक दृष्टिकोणानेही मर्यादित झालेली आहे."[३] आधुनिक टीकाशास्त्राच्या दृष्टिकोणातून विचार करता शोकनाटयात कथानकापेक्षा नायकाला अधिक महत्त्व असून शोकनाटयाचा तो केंद्रबिंदू असतो. कथानक हे त्याच्यासभोवती फिरते. आणि त्याला दुय्यम स्थान असते. नायक हा स्वतःचे भवितव्य घडवत असतो; त्याच्याजवळ तेवढी कुवत असते आणि केव्हा केव्हा स्वतःच्या पतनास तो स्वतःच जबाबदार असतो.

"It is his own character that works out events from within, his own emotions that prompt and mislead him. What he really is, is revealed by what becomes of him iu the end. when his story is complete, we see that it could not have been otherwise; and it is upon himself that the ultimate responsibility falls."[४]

शोकनाटयाच्या कथानकाचे हे विशेष असते की, शोकांतिकेला जबाबदार असणारी मध्यवर्ती परिस्थिती ही नायकामुळे निर्माण झालेली असते. बाहेरील प्रभावापेक्षा किंवा परिस्थितीपेक्षा तो स्वतः या शोकांतिकेला अधिक जबाबदार असतो. जॉन मॅसफिल्डचे 'नॅनची शोकांतिका' हे नाटक आपणास हेच दर्शविते. नॅन ही स्वतःच स्वतःच्या शोकांतिकेला अधिक जबाबदार आहे. डिक हा नॅनची क्षमा मागावयास तयार असून सुखी जीवन जगण्याची तो इच्छा करतो परंतु नॅन मात्र क्षमा करावयास, झालेले सर्व विसरण्यास तयार नाही. ती डिकला भोसकून ठार करते आणि 'A strange fish in the nets tomorrow.' असे म्हणत बुडून आत्महत्या करण्यासाठी जाते.

शोकनाटयामध्ये नायक हा कथानकाला आकार देत असतो; प्रसंगाना तेथे गौण स्थान प्राप्त होते. शोकनाटयाच्या नायकाचे अपवादात्मक व्यक्तिमत्त्व

३. गो. वि. करंदीकर : अॅरिस्टॉटलचे काव्यशास्त्र (१९५७), पान ४०

४. Smart J. S. : Tragedy (Essays and studies, Vol. VIII), Page—9

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हे शोकनाटयाचा पाया असून त्यामुळेच नायकाची शोकांतिका होत असते. त्याच्या स्वभावात, व्यक्तिमत्त्वात किंचितही जरी बदल झाला तरी संपूर्ण कथानकाला वेगळी कलाटणी मिळू शकेल. इतर प्रकारच्या नाटकाच्या बाबतीत मात्र अशी अवस्था निर्माण होऊ शकत नाही. ऑथेल्लोच्या स्वभावात, त्याच्या संशयी वृत्तीत किंचितही जरी बदल झाला तरी त्याची महान शोकांतिका टळू शकेल; नाटकाला वेगळीच कलाटणी मिळू शकेल. शेक्सपीअरच्या इतर शोकनाटयांच्या बाबतीत आपणास हेच तत्त्व लागू करता येईल. परंतु त्याच्या सुखांतिकेच्या संदर्भात मात्र तसे म्हणता येणार नाही. सुखांतिकेच्या नायकाच्या स्वभावात, व्यक्तिमत्त्वात बदल केला गेला तरी नाटकाला आश्चर्यजनक अशी कलाटणी मिळूच शकणार नाही. ईडिपस, ॲन्टीगनी, हॅम्लेट, ऑथेल्लो, लिअर, नोरा, नॅन, सुधाकर, मंदा, गणपतराव यासारख्या अपवादात्मक व्यक्तींमुळेच शोकांतिका घडत असते. ती व्यक्ती ज्या परिस्थितीत सापडलेली असते, त्या परिस्थितीपेक्षा त्या व्यक्तीची जबरदस्त आंतरिक प्रेरणा, तिची जीवनमूल्यावरील अढळ निष्ठा शोकांतिकेला अधिक जबाबदार असते. म्हणून आपणास असे म्हणावे लागेल की "The plot seems to be the mere canvas and character the portrait."

शोकनाटयाचा नायक ज्या परिस्थितीत सापडलेला असतो. त्याच परिस्थितीत जर सर्वसामान्य माणूस सापडला तर त्याची शोकांतिका होऊच शकणार नाही, तो माणूस त्या परिस्थितीला शरण जाईल व कदाचित् सुखीही होऊ शकेल. आणि शोकनाटयात नायकाला प्रधानस्थान प्राप्त होते. व कथानकाला दुय्यम. हॅमिल्टन या टीकाकाराने ऑर्थर स्पिनेरो या नाटककाराविषयी म्हटले आहे की, तो एखादा विषय घेऊन लिखाणास सुरवात करत नाही, प्रसंग घेऊन अगर प्रसंगाची मालिका घेऊनही सुरुवात करत नाही तर तो जी व्यक्तिरेखा त्याला आकर्षित करते ती घेऊन सुरवात करतो. शोकनाटय लिहिणाऱ्या नाटककाराच्या बाबतीत आपणास हेच म्हणावे लागेल. प्रेक्षकालाही कथानकापेक्षा नायकाविषयीच अधिक आकर्षण असते. त्याच्यावर ओढवलेल्या आपत्तीतून तो कसा मार्ग काढतो ते पाहण्यासाठी प्रेक्षक आतुर असतो. शोकनाटयाच्या विश्वात नायकाला असे अनन्यसाधारण स्थान असते; कथानकावर नेहमीच त्याचे वर्चस्व असते.

कथावस्तूच्या बांधणीचा विचार करत असताना मात्र ॲरिस्टॉटलने सांगितलेली पांचहि तत्वे अत्यंत महत्वाची असून त्या बाबतीत टीकाकारांचे

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मतभेद होण्याचे कारण नाही. शोकनाट्याचा उद्देश सफल व्हावयाचा असेल त्याचा प्रेक्षकाच्या मनावर साकल्याने होणारा परिणाम शोकात्म व्हावयाचा असेल तर कथावस्तूची बांधणी कलात्मक व्हावयास हवी, कथानकाचे आकारमान सौंदर्य प्रकट करण्यास समर्थ व्हावयास हवे आणि कथानकांतर्गत सर्व घटना संभवनीय अशा कार्यकारण संबंधाने बद्ध झालेल्या आहेत असे वाटावयास हवे. त्यात कृत्रिमता निर्माण होता कामा नये. कथावस्तूच्या बांधणीसंबंधीचे ॲरिस्टॉटलचे निरीक्षण फारच सूक्ष्म असून आजही ते शोकनाट्याला लागू पडते. परंतु ॲरिस्टॉटलच्या काव्यशास्त्राचा आधार घेऊन इटालियन टीकाकारांनी मांडलेली तीन तत्त्वे– स्थलैक्य, कालैक्य, कृत्यैक्य- मात्र नाटककारांनी पाळलेली दिसत नाहीत. स्थलैक्य व कालैक्य ही दोन तत्त्वे नाही पाळली तरी नाटकाला कोणत्याही प्रकारची बाध येत नाही. शोकनाट्याचा सम्राट समजल्या जाणाऱ्या शेक्सपीअरनेही ती पाळलेली नाहीत. आधुनिक शोकनाट्यातही आपणास तेच आढळून येते. वि. वा. शिरवाडकरांच्या 'दुसरा पेशवा' ह्या शोकनाट्यात बंगशाच्या– छत्रसाल राजाचा दरबार, नर्मदेचा तीर, पुण्यातील शनिवार वाडा अशा निरनिराळ्या ठिकाणी प्रसंग घडतात, तसेच नाटकाच्या कथानकाचा काळ जवळजवळ दहा वर्षांपेक्षा अधिक आहे. अशा रीतीने वि. वा. शिरवाडकरांनी स्थलैक्य व कालैक्य यांचे बंधन मुळीच पाळलेले नाही आणि आणि तरीही 'दुसरा पेशवा' हे एक मराठीतील दर्जेदार शोकनाट्य ठरले आहे. परंतु शोकनाट्य यशस्वी आणि परिणामकारक ठरण्यासाठी कृत्यैक्याचे बंधन मात्र आवश्यक आहे.

शोकनाट्याच्या कथावस्तूचा विचार करत असताना नाटककाराने तिची रचना कोणत्या प्रकारे केली आहे तेही पाहणे आवश्यक असते. कथावस्तूमध्ये नायकाशी संबंधित, नायकाच्या व्यक्तिमत्त्वावर प्रकाश टाकणारी मुख्य घटना असते आणि या मुख्य घटनेच्या जोडीला नाटककार इतर प्रसंग उभे करत असतो. हे प्रसंग मुख्य घटनेच्या विकासाला मदत करतात किंवा मुख्य घटनेवर आणि पात्रांवर प्रकाशझोत टाकण्याचे कार्य करतात. मात्र अशा प्रसंगांना कथावस्तूमध्ये दुय्यम स्थान असून मुख्य घटनेच्या ओघाने ते आलेले असतात. अशा प्रसंगांवर वाजवीपेक्षा अधिक भर दिला तर मात्र ते मुख्य घटनेला मारक ठरतात. मुख्य घटना ही नायकाच्या जीवनाचा वटवृक्ष असून इतर प्रसंग हे त्या वृक्षाच्या पारंब्या होत; दोन्हींचा उद्देश शेवटी त्या नाटकाचा कलात्मक दर्जा वाढविणे हाच असतो.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

काहीवेळा नाटककार मुख्य कथानकाच्या जोडीला उपकथानकाची निर्मिती करत असतो. हे उपकथानक मुख्य कथानकाशी समांतर असते व त्याला स्वतंत्र नायक व नायिका असतात. मुख्य कथानक व उपकथानक अशी दुहेरी गुंफण नाटककाराने केलेली असल्यामुळे नाट्याची वीण साधी न राहता संमिश्र किंवा गुंतागुंतीची होते. ही संमिश्र किंवा गुंतागुंतीची कथावस्तू अत्यंत कौशल्याने व कलात्मकतेने हाताळावयास हवी; नाहीतर नाटक यशस्वी होणार नाही. तसेच उपकथानक मुख्य कथानकास बाध न आणणारे असावयास हवे, मुख्य कथानकाचे महत्त्व अबाधित राहूनच त्याचा विकास व्हावयास हवा. नाहीतर एका नाटकात दोन नाटके असा प्रकार होईल आणि कृत्यैक्याला बाध येऊन परिणामाच्या दृष्टीने नाटक अपयशी ठरेल. तसेच त्यामुळे प्रेक्षकाचे मनही विचलित होईल व ते शोकनाट्य त्याच्या मनावर योग्य तो शोकात्म परिणाम करू शकणार नाही आणि ती संपूर्ण कलाकृती विस्कळित, असंबद्ध अशी होईल.

◆ ◆ ◆

१९४७–१९५४ पर्यंत झालेल्या मराठी पुस्तकांत प्रथम
क्रमांकाचे साहित्य अकादमी (नवी दिल्ली) चे
रु. पाच हजार पारितोषिक प्राप्त झालेले

वैदिक संस्कृतीचा विकास

(सुधारून वाढविलेली नवीन आवृत्ती)

पृ. ६०० ] [ किंमत ३० रुपये.

लेखक– तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी.

वैदिक संस्कृतीचे विकसित रूप म्हणजेच आजची भारतीय संस्कृती होय. भारतीय संस्कृतीच्या जन्मापासून आतापर्यंत झालेल्या स्वरूपाचे वर्णन या पुस्तकात प्राधान्याने केले आहे.

प्रकाशक : प्राज्ञपाठशाळामंडळ वाई (जि० सातारा)



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## पुस्तक-परामर्श

श्री. ग. वि. अकोलकर

# श्रीशिवछत्रपतींच्या संस्मरणाचे प्रयोजन

' नवभारत 'च्या एप्रिल अंकातील भाई माधवराव बागल यांचा ' शिवछत्रपति ' हा लेख वाचून मन खिन्न झाले. छत्रपतींच्या राज्याभिषेक महोत्सववर्षी ' समर्थ-शिवाजी '-वादाची गाडलेली भुते उकरून काढण्याची काही गरज आहे का, असा प्रश्न मनासमोर उभा राहतो. शिवाजीमहाराजांनी राज्याभिषेक करून घेण्याचीच गरज नव्हती असा भाई बागलांचा दृष्टिकोण असल्याने वाद केव्हा उकरून काढावा, याचा औचित्यविवेक करण्याचे कारण नाही हे तर खरेच; सर्व लेखाला ' ब्राह्मण-ब्राह्मणेतर-वादा 'चा उग्र दर्प येत आहे. शिवरायांची नि समर्थांची भेट कधी झाली, समर्थांनी ' राजकारण ' केले म्हणजे काय केले, समर्थ विषमतेवर नि चातुर्वर्ण्यव्यवस्थेवर आधारलेला समाज पुनः दृढपणे प्रस्थापित करीत होते काय; शिवरायांनी समर्थांपासून की समर्थांनी शिवप्रभूंपासून स्वराज्य-स्थापनेची स्फूर्ती घेतली—हे सारे जुनेच वाद श्री. बागलांनी लेखातून सूचित केले आहेत. आपल्या मताला पुष्टिकारक होतील अशा लेखकांचा नि आचार्य भागवतांचा आधार घेतला आहे.

श्री शिवाजी महाराज हे स्वतंत्र प्रज्ञेचे पुरुष होते. त्यांची स्वधर्मनिष्ठा जाज्ज्वल्य होती, धैर्य अलौकिक होते, दृष्टी विशाल होती, तशीच ती दूरगामीही होती. त्यांच्या प्रयत्नाने परकीय सत्ता महाराष्ट्रातून नष्ट झाली. स्वराज्यस्थापना करून मराठा समाजात स्वाभिमानाचे नि आत्मविश्वासाचे नवे वारे महाराजांनी खेळविले, धर्म व न्याय यांची प्रजाहिततत्पर दृष्टीने स्थापना करणारा भूपती, लोकनेता कसा असावा याचा आदर्श समाजापुढे त्यांनी ठेवला-याबद्दल कुणाचाच मतभेद नाही. पण त्यांचे मोठेपण सांगताना तत्कालीन समाजस्थिती, सामाजिक मूल्ये आणि अन्य चळवळी यांचा विपर्यास व सत्यापलाप करण्याची काही गरज नाही. खुद्द समर्थ रामदासही शिवरायांना ' देणे ईश्वराचे ' म्हणून संमानीत होते आणि त्यांच्या गुणांचे अनुकरण त्यांच्या वारसदारांनी आणि जनतेने करावे असे उपदेशित होते. स्वधर्म– आणि स्वराज्य या दोहोंची स्थापना ही त्या काळात अलग अलग कार्ये नव्हतीच. ती दोन्ही एकजीवच होती; आणि म्हणून ब्राह्म आणि क्षात्र ही दोन्ही तेजे परस्परांना उपकारक व साहाय्यक होऊन त्याकाळी काम करताना दिसतात. या म्हणण्याने श्री

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शिवाजीराजांचे महत्व कोठेच कमी होत नाही. ही दोन तेजे म्हणजे ज्ञान आणि शौर्य यांची प्रतीके होत आणि सर्वच काळी समाजजीवनाला—समाज-धारणेला नि समाज-प्रगतीला त्यांची गरज असते. कालमानाप्रमाणे त्यांच्या आविष्काराचे स्वरूप वेगळे असते एवढेच.

भाई बागल यांनी आपल्या लेखात अवधानाने म्हणा की अनवधानाने म्हणा एक वाक्य लिहिले आहे ते असे—' म्हणून त्यांच्या त्या काळच्या कृत्याची आजच्या काळाच्या परिस्थितीशी तुलना करता येणार नाही. ' हेच तत्व सर्व इतिहासाकडे पहाताना भाई बागल यांनी मनाशी वागविले असते, तर लेखात जी बेछूट विधानांची खैरात त्यांनी केली आहे, ती टळली असती. आजच्या सामाजिक-राजकीय मूल्यांचा निकष लावून तत्कालीन समाज, समाजधुरीण त्यांचे संबंध व कार्य यांचे विवेचन करण्याची, ऐतिहासिक दृष्टिकोण न बाळ-गण्याची महाराष्ट्रात एक परंपरा निर्माण झालेली आहे. भाई बागल त्याच परंपरेतले आहेत.

सुमारे चाळीस वर्षापूर्वी कराड येथील सुप्रसिद्ध समाजसेवक व राष्ट्रभक्त श्री. अळतेकर वकील यांनी एक विस्तृत चरित्र लिहिले होते. समर्थ शिवरा-यांच्या भेटीच्या वादाची उपलब्ध साधन-सामग्रीच्या आधारे पुराव्याची कसून छाननी करून त्यांनी वाद संपुष्टात आणला होता. डॉ. बाळकृष्ण, श्री. केळुस्कर श्री. सरदेसाई यांच्या मतांचे त्यांनी साधार खंडन केले होते. याखेरीज प्रि. भाटे, भारताचार्य श्री. चिं. वि. वैद्य यांच्या आक्षेपांनाही त्यांनी उत्तर दिले होते. श्रीशिवरायांना स्वराज्य स्थापण्याची स्फूर्ती समर्थ कृष्णातीरी येण्यापूर्वीच होऊन त्यांनी कार्याला आरंभही केला होता : समर्थांनाही स्वधर्म स्थापनेची स्फूर्ती व त्याप्रीत्यर्थ स्वराज्य स्थापनेची आवश्यकता यांची जाणीव कृष्णातीरी येऊन शिवरायांची गाठ पडण्यापूर्वीच झाली होती, असा निष्कर्ष अळतेकरांनी काढला आहे. या दोन महापुरुषांचे कार्य परस्परांना पोषकच ठरले आणि स. १६४९ मध्ये त्या दोघांची प्रथम भेट झाल्यापासून ३०-३२ वर्षे स्वराज्य नि स्वधर्म यांच्या स्थापनेचे संयुक्त कार्य महाराष्ट्रात वेगाने सुरू झाले. हा वाद या निष्कर्षाने संपावयाला हरकत नव्हती. पण दुर्दैवाने श्री. न. र. फाटक प्रभृतींनी केवळ एकांगी दृष्टिकोणातून हा वाद चालू ठेवला आणि समाजात बुद्धिभेद माजविण्याची आपली हौस फेडून घेतली.

' समर्थांच्या राजकारणा'चीही विस्तृत चर्चा श्री. अळतेकरांनी त्यावेळी केली होती. अगदी अलिकडे ( १९६४ ) विजापूरचे थोर गांधीवादी समाज-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सेवक पद्मश्री काकासाहेब कारखानीस यांनीही या विषयाची चर्चा केली आणि समर्थांच्या ब्राह्मणपक्षपातित्वाच्या आक्षेपाला सप्रमाण उत्तर दिले आहे. ( श्रीसमर्थ रामदास : विचार आणि कार्य पा. १०२–१४; १२२–५५) समर्थांच्या ब्राह्मणेतर शिष्यांची व मठप्रमुखांचीही यादी काकासाहेबांनी सादर केली आहे. खरी गोष्ट अशी आहे की श्री. अळतेकर व श्री. कारखानीस म्हणतात त्याप्रमाणे आजचा 'ब्राह्मण–ब्राह्मणेतर–वाद' शिवकालीन महाराष्ट्रात कधीच नव्हता. त्या वादाचा चष्मा डोळ्यावर चढवून फाटक काय नि बागल काय ही मंडळी समर्थ–शिवराय यांच्या संबंधाबद्दल आणि कार्याबद्दल हठाग्रहाने विवेचन करतात. या वादांच्या समारोपादाखल पद्मश्रींनी जे लिहिले आहे ते चिंतनीय आहे. ते म्हणतात :

" काहींनी जातीय द्वेषामुळे, काहींनी पक्षांधतामूलक, काहींनी पंथाभिनिवेशाने, व काहींनी राजकीय पदद्वेषाने व अपवादात्मक लेखकांनी प्रामाणिक मतभेदाने असे ते लिखाण केले आहे. पण या सर्वांचा परिणाम मात्र अज्ञजनतेचा श्रीसमर्थांच्या एकंदर कार्याविषयी बुद्धिभेदच उत्पन्न करण्यात झाला आहे, हे गेल्या ३०।४० वर्षांच्या महाराष्ट्राच्या राजकीय, सामाजिक घडामोडींवरून स्पष्ट दिसून येत आहे व त्याची फळे तो चाखीतच आहे. " ( उपरोक्त पा. १४९ )

श्री. अळतेकर व श्री. कारखानीस यांचे लिखाण बागलानी वाचावे ही अपेक्षा चुकीची आहे : पण निदान तरुणपिढीने तरी डोळसपणे ते वाचावे आणि कुठल्याच वादाच्या आहारी जाऊ नये, अशी इच्छा करायला काहीच हरकत नाही.

आपल्या लेखाच्या शेवटी आचार्य भागवतांची म्हणून लेखकाने काही अवतरणे घेतली आहेत. पण त्याचा स्थलसंदर्भ सांगितला नाही. आचार्यांच्याच लेखांत समर्थ आणि शिवराय यांचे संबंध व समर्थांचे कार्य याविषयी वेगळीच विधाने आढळतात: 'जीवन आणि साहित्य' हा आचार्यांच्या १९३५–४१ या काळातील लेखांचा संग्रह सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेने प्रकाशित केला आहे. त्यात 'समर्थांचे स्मरण' आणि 'आजचा महाराष्ट्रधर्म' असे दोन लेख ( पृ. १७६–८४) समर्थांविषयी आहेत. त्यातील महत्त्वाची विधाने अशी :–

१. 'समर्थ आणि शिवाजी यांच्या ध्येयदृष्टीत एकत्व असल्यामुळे महाराष्ट्रधर्म महाराष्ट्रात प्रभावी झाला, आणि परचक्रापासून त्याचे रक्षण झाले. महाराष्ट्राच्या इतिहासात समर्थ-शिवाजीची जोडी अभेद्य आहे (पा. १७७)

अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

२. 'महाराष्ट्रधर्माचे प्रवक्ते श्रीसमर्थ रामदासस्वामी यांनी आपल्या दासबोध ग्रंथात महाराष्ट्रधर्माची तीन तत्त्वे सांगितली आहेत. ईश्वरोपासना, स्वराज्यसाधना आणि जीवनाच्या सर्व क्षेत्रात सावधानता ही ती तीन तत्त्वे होत. (पा.१७९)

३. सामाजिक उच्चनीच भेदांची तीव्रता कमी करून सर्वलोकात बंधुभावाची वृत्ती त्यांनी जागृत केली. स्वधर्माचा, स्वसंस्कृतीचा व स्वभाषेचा अभिमान यांचे संवर्धन केले. या संतमंडळातील शेवटचे श्रीसमर्थ रामदास स्वामी यांनी या धर्मकार्याला समाजाच्या सर्वांगीण संघटनेचे स्वरूप दिले. ( पा. १८१ )

४ 'महाराष्ट्र राज्य जिकडे तिकडे करण्याची शंभू छत्रपतीला त्यानी प्रेरणा दिली' ( पा. १८२ )

वरील लेखात शिव-समर्थांच्या कार्याची त्यावेळच्या विचारसरणीमुळे आणि समाजरचनेमुळे पडलेल्या मर्यादांची स्पष्ट चिकित्सा ऐतिहासिक दृष्टिकोणातून आचार्यांनी केली असून समर्थांच्या कार्यातील ग्राह्यांश कोणता, 'मराठा' शब्दाचा खरा अर्थ काय यासंबंधीही विवेचन आहे. तेव्हा आचार्यांच्या लिखाणाचा आधार बागलांना उपयोगी पडणार नाही. सर्वसामान्यपणे आचार्यांचे लेखन समतोल आणि ऐतिहासिक दृष्टी ठेवून केलेले आहे. भाई बागलांजवळ नेमका त्या दृष्टीचा अभाव आहे.

वर म्हटल्याप्रमाणे श्रीशिवप्रभूंनी स्वराज्यस्थापना करून देशप्रेम आणि न्याय या दोन मूल्यांची महत्त्वाची देणगी महाराष्ट्राला व भारतीयांना दिली; अखंड उद्योगाची आणि विधायक कार्यांची शिकवण स्वतःच्या आचरणातून दिली. आज गरज आहे ती याच गुणांची. राज्याभिषेक सोहळा साजरा करताना गतकालीन वैभवाच्या नि पराक्रमाच्या स्मृतीने छाती जरूर फुगावी, मान ताठ व्हावी, पण ती पुढे दौडत जाण्यासाठी व्हावी; विषारी फुत्कार सोडण्यासाठी नव्हे तर प्रेम, शांती, ऐक्य नि प्रगति या गुणांच्या संवर्धनासाठी असावी. आणि ज्यांना ऐतिहासिक सत्यच शोधावयाचे असेल त्यांनी इतिहासाशी प्रामाणिक रहावे, पूर्वग्रहदूषित मनाने इतिहासाचे सत्य गवसत नसते. इतिहासाच्या एकांगी अध्ययनाचे दुष्परिणाम जगातील अनेक राष्ट्रांनी अनुभवले आहेत, द्वेषाची बीजे त्यामुळे पेरली गेली आणि युद्धाचे वणवे पसरले. महाराष्ट्राने आणि भारताने या धोक्यापासून सावधपणे बोध घेतला तर स्वराज्याचे सुराज्य होण्याची काही आशा आहे.

◆ ◆ ◆

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. लालजी उपाध्ये

# युरोपीय संस्कृतीचा उषःकाल*

प्रागैतिहासिक काळाच्या अभिनूतन युगात युरोपात अर्थशास्त्रीयदृष्टया संस्कृतीचा संपूर्ण अभाव होता. हिमयुगाच्या अखेरच्या टप्प्यात विस्तीर्ण तृणाच्छादित मैदानावर चरणाऱ्या पशूंची सामूहिक शिकार हे जनसमूहांचे उपजीविकेचे साधन होते. मृगयेसाठी पाषाणाची हत्यारे बनवली जात. क्रमाक्रमाने हवामानातील थंडीचा कडाका कमी होत जाऊन हिमनद्यातील बर्फ वितळू लागले; त्या योगाने समुद्र-सपाटीची पातळी उंचावली, व समुद्रालगतचा सखल प्रदेश जलमग्न झाला. नित्य–हरित वृक्षांची वने वाढू लागली. माणूस नेहमीच बदलत्या पर्यावरणाशी अनुरूप अशा प्रकारे आपला जीवन-क्रम बदलून घेण्यात तत्पर असतो. अरण्यातील छोटया पशूंची शिकार करताना पाठलाग करण्यासाठी मदतनीस म्हणून त्याने लांडग्याच्या जातीचे कुत्रे पाळले. कवचीदार फळे व कवचीदार जलचर जमविणे, शिकार, मासेमारी यांसारख्या उद्योगाने तो अन्न जमवी, व त्यावर उदर-भरण करी. युरोपात जागोजाग पुरा–वस्तु–शास्त्रज्ञाना उत्खननात, नैसर्गिक गुहांमध्ये सापडलेली हत्यारे, अवजारे, उपकरणे मातीची भांडी, कबरी व स्मशाने, अलंकार, जीवाश्म ( फॉसिल ) बनलेल्या वनस्पती व धान्ये, हाडे, इमारतींचे अवशेष वगैरे साधनांच्या आधारे तत्कालीन रहाणी व पर्यावरण यासंबंधी अनुमाने काढण्यात आली आहेत. युरोपच्या विस्तीर्ण मैदानात बृहत्काय ( मॅमॉथ ) पशूंची मृगया केली जाई. त्याकाळापासून अविच्छिन्नपणे मानववस्ती अस्तित्वात आहे. मध्य–पाषाण युगात कुंभार–काम, सुतार–काम, मच्छीमारी, पशूंची शिकार यासाठी उपयोगी अवजारे प्रचारात आली असली तरी मानव अद्यापही अन्न जमवून चरितार्थ चालवीत असे. अन्नाचे उत्पादन करून स्वावलंबी बनण्याचे सामर्थ्य त्याचे ठायी आलेले नव्हते. अन्न–संकलक समूहांचे अवशेष युरोपात जागोजाग मिळाले आहेत.

नैसर्गिकरीत्या उपलब्ध असलेल्या अन्न--पुरवठ्यावर अवलंबून असलेले मृगया–युगातील मानव–समूह आपल्या पर्यावर्णावर संपूर्णपणे अवलंबून होते. ते पशुपालन व अन्न–धान्याची शेती करू लागल्यावर अन्न–पुरवठ्यावर त्यांचे

---

* 'धि डॉन ऑफ् युरोपियन सिव्हिलिझेशन' ह्या व्ही. गॉर्डन चाइल्ड ह्यांच्या ग्रंथाचा परिचय.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वर्चस्व प्रस्थापित झाले. स्वाभाविकच लोकसंख्येच्या वाढीला संधी मिळाली. प्रारंभीचे शेतकरी-समूह पूर्णपणे स्थिर नव्हते. सुपीक जमिनीच्या शोधात ते भटकत रहात. तशी जमीन व पाणी-पुरवठ्याची सोय उपलब्ध होईल त्या त्या जागी ते स्थिर होऊ लागले. मानवी इतिहासातील ही दुसरी क्रांती होय. जगामध्ये ही क्रांती जेथे पहिल्यांदा झाली ते प्रदेश म्हणजे इजिप्तमधील नाइल नदीचे खोरे, मेसापोटेमियातील युफ्राटिसचे खोरे, तसेच हिंदुस्तानातील सिंधू खोरे हे होत. अन्नाचे मुबलक उत्पादन त्या प्रदेशात करता येत असल्यामुळे कारागीर, सैनिक, राजे किंवा शासक, धर्माचे उपदेशक यांचा नवा वर्ग उदयास येऊ शकला. साक्षर संस्कृती अस्तित्वात आली. कला-कुसर व हुन्नर हा या दुसऱ्या क्रांतीचा आधार होय. अधिकाधिक जमीन लागवडीखाली आणणे, पाळीव पशू चारण्यासाठी कुरण हस्तगत करणे, कायम स्वरूपाची वस्ती स्थापन करून कृषि-ग्राम वसविणे असे नव्या अर्थ-व्यवस्थेचे स्वरूप होते. हमखास व विपुल अन्नाच्या पुरवठ्याची सोय शेतीमुळे होऊन औद्योगिक कारागीर व व्यापारी यांच्या नागरी समाजाची उतरंड तयार होणे हे या दुसऱ्या क्रांतीचे एक लक्षण होते. शेतीचा उद्योग नैर्ऋत्य आशियात सुरू झाला असला पाहिजे. तेथून काही जन-समूह खुष्कीच्या मार्गाने किंवा जलमार्गाने हळूहळू युरोपात जाऊन तेथे कायमपणे वस्ती करून शेती करू लागले असावेत. भूमध्यसागर प्रदेशाच्या पूर्व विभागातील सागर-तीरावरील मच्छीमार जनसमूहांना शेतीचे तंत्रपूरक उद्योग म्हणून नैर्ऋत्य आशियातील रहिवाशांकडून अवगत झाले असावे, व हे मच्छीमार होड्यांमधून युरोपात भूमध्य-सागरातून गेल्यावर शेती व पशु-पालन करू लागले असावेत. ग्रीसच्या दक्षिणेस भूमध्य सागरातील क्रीट बेटावर आढळलेल्या पुरातन अवशेषांवरून तेथे आशियाई कृषीवल व पशुपाल जनसमूह यांची वस्ती होती असे अनुमान निघते.

ग्रीसच्या पूर्वेकडील ईजियन द्वीप-समूहात मेसापोटेमियातून जाण्याचे प्राचीन मार्ग म्हणजे भूमध्य-सागराच्या पूर्व भागाचा किनारा तसेच अनातोलियाचे पठार हे होत. ख्रिस्तपूर्व दोन हजार वर्षांचे सुमारास अनातोलियात असीरियातील व्यापारी धातु-मृत्तिकेच्या लोभाने येऊन वस्ती करून राहिले. त्यांच्या समवेत तेथे काहीसे नागर जीवन व शासन-संस्था यांचा श्रीगणेशा झाला. तेथे आढळलेल्या पुरातन अवशेषांवर पौर्वात्य जीवनाची स्पष्ट छाप दिसून येते. ईजियन द्वीप-समूह म्हणजे अनातोलिया व ग्रीस यांजमधील प्राचीन भू-सेतूचे अवशेष होत. त्या मार्गाने आशियातून युरोपात सांस्कृतिक कल्पनांचे आगमन झाले. ईजियन बेटे नागर संस्कृतीला लागणाऱ्या तांबे, संगमरवर,



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कुरुंद यांसारख्या कच्च्या मालाच्या पुरवठ्याचे केंद्र होती. व्यापारी वर्ग व कांचे यांची तेथे प्रामुख्याने वस्ती असे.

पुरा-अश्म युगातील अन्न-संकलक जन-समूहांची ग्रीसमध्ये वस्ती असल्याचा पुरावा मिळतो. पण त्यानंतरच्या काळातील मध्य-अश्म-युगीन जन-समूहांच्या अवशेषांचा अद्याप तेथे आढळ झालेला नाही. प्रगल्भ दशेस पोचलेल्या नव-अश्म युगाच्या संस्कृतीचे अवशेष केवळ मातीच्या भांड्याच्या रूपाने उपलब्ध आहेत. तेथे वस्ती करून राहिलेल्या प्रारंभीच्या कृषीवलसमूहांची ती जणू प्रतीके होत. हे अवशेष संपूर्ण बाल्कन द्वीपकल्पाच्या प्रदेशात व भूमध्य-सागराच्या पश्चिम भागालगतच्या भूमीवर सापडतात. ह्या जन-समूहांची अर्थव्यवस्था व विचार-सरणी नैर्ऋत्य आशियातील पूर्वकालीन कृषीवलांच्या अर्थव्यवस्थेशी व विचारांशी मिळती जुळती होती. नव-पाषाण युगाच्या मध्य कालखंडात पर्वतमय बाल्कन द्वीपकल्पात एक सुसंपन्न संस्कृति नांदत होती. ख्रिस्तपूर्व दीडहजार वर्षानंतरच्या काळात ग्रीसचा व्यापार, संपत्ति, कला-वैभव यांचा ऱ्हास सुरू झाला. कारण ग्रीसमध्ये लष्करशाही माजली, व व्यापाराऐवजी चाचेगिरीस ऊत आला. मात्र शस्त्रनिर्मितीच्या उद्योगास तेजी आली, अद्याप रानटी अवस्थेत असलेल्या पश्चिम युरोपशी ग्रीसचा व्यापारही वाढत राहिला. पुरातन कालीन युरोपातील पहिले घोड-दळ ग्रीसमध्ये उभारले गेले.

काळा समुद्र व आड्रियाटिक समुद्र यांच्या दरम्यानच्या द्वीपकल्पाचे हवा-मान आशियाई ग्रामीण अर्थव्यवस्था प्रचलित होण्याच्या दृष्टीने नव-पाषाण युगात शेष युरोपच्या अरण्यमय प्रदेशाहून जास्त अनुकूल होते. तेथे स्थायीपणे स्थापन झालेल्या खेड्यांचे अवशेष आढळले. माती व कडबा यांच्या भिंतींची प्रशस्त घरे, मातीची भांडी, अलंकार, शेतीची अवजारे, धान्यांचे जीवाश्म ( फॉसिल ) सापडले. पाषाण, गारगोटी, हाडे, कासे, लोखंड अशी विविध प्रकारची उपकरणे व हत्यारे मिळाली. बाल्कन प्रदेशातील जनसमूहानी नैर्ऋत्य आशियाई ग्रामीण अर्थव्यवस्था आपल्या पर्यावरणास योग्य अशा फेरफारासह-स्वीकारल्याचा निष्कर्ष निघतो. मात्र त्यांनी तदनंतरच्या कांस्य ( ब्राँझ ) युगास अनुरूप असे परिवर्तन आपल्या रहाणीत करण्याचे पुढचे पाऊल उचलले नाही; तसेच शेजारच्या ईजियन द्वीप-समूहातील जन-समूहांचे तांत्रिक कसब उत्तर युरोपात पोचविण्यासही त्यांची मदत झाली नाही.

मध्य युरोपात नद्यांच्या खोऱ्यांतील जमीन गाळ साचून सुपीक झाली असल्याने कसण्यास सोयीची व सुलभ बनली. तसेच विपुल पाणी–पुरवठा व


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

निचऱ्याची नैसर्गिक व्यवस्था, यामुळे शेती होऊ लागली. प्रारंभी भटक्या शेतीची पद्धत रूढ असल्याने उत्खननामधून थरांनुसार कालानुक्रम लावता येत नाही. प्रारंभी शेतीचे तंत्र ओबड-धोबड असूनही प्रशस्त घरे बनवली जात. कुणबावे कुटुंबवार नव्हते; गोत्र-वार ( क्लॅन ) होते. स्वयंपूर्ण अर्थव्यवस्था प्रचलित होती. नव्या, जास्त सुपीक जमिनीकडे स्थलांतर करताना निवडक अवजारे व सामुग्री बरोबर नेत. वेगवेगळ्या जन-समूहांमध्ये मालाची देवघेव होई; दळणवळण चाले. एकंदरीने हे जन-समूह शांतता-प्रिय, समतानिष्ठ, लोकशाहीवादी, सामूहिक जीवन जगणारे असल्याचे अनुमान निघते. समाजाची संपत्ति देवतांचे प्रतिनिधी किंवा समूहाच्या प्रमुखव्यक्तींच्या हाती केंद्रित होत नसे. प्रेते आखुड पद्धतीने, गुडघे हनुवटीपाशी आणून पुरली जात. जर्मनीत अशी संस्कृति खिस्तपूर्व चार हजार वर्षे या काळी प्रचलित होती. खिस्तपूर्व २००० वर्षे हा कांस्ययुगाचा प्रारंभकाल होय.

भूमध्य सागराच्या पूर्व विभागात खिस्तपूर्व दोन हजार वर्षांपूर्वी कांस्य युगाचा ( ब्राँझ ) प्रारंभ झाला असे मानतात. कारागीर हेच व्यापारी असत व त्यांची नित्य फिरती चाले. ते वस्तु बरोबर घेऊन जात असता मार्गात धोका निर्माण झाल्यास वस्तु पुरून ठेवीत, व पुढे त्या पुनः शोधून काढणे त्याना जमत नसे. अशा वस्तु उत्खननात आढळल्या, व त्यांजवरून अशा कारागिरांच्या प्रवासाचे मार्ग समजून आले. इजिप्त व आशियातील कारागिरांपेक्षा मध्य युरोपातील तांबट वर्गात नाविन्य व शोधकपणा जास्त होता. तांबे व टिन यांच्या मिश्रणाने बनवलेल्या ब्राँझचे विळे कापणीसाठी बनवीत. त्या काळात इजिप्तचे शेतकरी मात्र पूर्ववत् गारगोटीचे विळे वापरीत. मध्य युरोपात इतर प्रदेशातून लोक येऊ लागल्याने लोकसंख्या वाढली. उद्योग-धंदे व व्यापार सुरू झाला. शहरे वसू लागली.

डोब्रूज व कार्पेथियन प्रदेशापासून काकेशस पर्वत व व्होल्गा नदीपलीकडील आल्ताईपर्यंतच्या निर्वृक्ष, तृणाच्छादित मैदानात ( स्टेप ) जागोजाग थडग्यां-वरील पाषाणांच्या ढिगाऱ्यांचे अवशेष मिळतात. या गवती मैदानांतील लोक नव-पाषाण युगात चाके असलेल्या गाड्या वापरीत. शिकार, पशुपालन, शेती असे व्यवसाय चालत, तांब्याचे परशु बनवले जात, उत्पादन-शील ग्रामीण अर्थ-व्यवस्था प्रचलित होती. पशु-पालनाबरोबरच पितृसत्ताक सामाजिक संघटनाचा प्रादुर्भाव झाला. अशा समाज-रचनेत सामाजिक दर्जामधील भेद-भाव आणि समर-प्रसंग हे ओघानेच येतात. शिकारीच्या सामूहिक मोहिमा आणि पशु-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पालनासाठी नव्या नव्या कुरणांचा शोध यामुळे घडणाऱ्या भ्रमंतीच्या योगे आपापसात संपर्क वाढीस लागे. परशु व चाकाची गाडी यांचा प्रसार जेत्या जमातींच्या वर्चस्वामुळे नव्हे तर अशा परस्पर संपर्कामुळे झाला असावा.

उत्तर युरोपच्या प्रागितिहासाची पाषाण, कांस्य व लोह अशी तीन युगे कल्पिली जातात. टॉमसनने १८१२ त तीन युगांची कल्पना मांडली, ती अद्याप प्रचलित आहे. १८७० त वर्साएने पाषाण–युगाच्या पूर्व व उत्तर अशा टप्प्यांचा विचार मांडला. पुढे मॉंटेलियसने नव–पाषाण उप–युगाचे चार खंड मानण्याची परंपरा रूढ केली. गारगोटीच्या कुऱ्हाडी आणि पाषाणाची विशाल थडगी यांच्या आकार–मानाच्या आधारे हे खंड–विभाजन त्याने केले होते. यातील प्रथम सोडून उरलेल्या तीन काल–खंडाना बृहत्पाषाण थडग्यांचे नामाभिधान वापरण्यात येते. ते असे:– डॉल्मन, पॅसेज-ग्रेव्ह आणि स्टोन-सिस्ट. १९४५ नंतर डेन्मार्क व स्वीडन या देशातील प्रागितिहासकारानी नव-पाषाण उप-युगाची प्रारंभिक, मध्य व अंतिम अशी तिहेरी विभागणी केली. सूक्ष्म विवेचनासाठी त्यांचेही पोट-विभाग करण्यात येतात. प्रारंभिक नव–पाषाण कालखंडाचा एक टप्पा तत्कालीन मातीच्या घटाच्या आकार-प्रकारावरून फनेल-बीकर संस्कृती हा मानला जातो. मॉंटेलियसने बाल्टिक सागराच्या पश्चिम तीरावरील ( स्वीडनच्या ) प्रदेशामधील उत्खननाच्या आधारे थडग्यांच्या आकारप्रकारावरून जे टप्पे पाडले ते तसेच मध्य-युरोप, दक्षिण रशिया, तुर्कस्तान याही प्रदेशाना ओढून ताणून लागू करण्याचा अट्टाहास त्याच्या परंपरेचे अनुयायी म्हणवणाऱ्या कित्येकानी चालवला. त्यातूनच पुढे विकृत कल्पनांचे धुके माजून नॉर्डिक वंशासंबंधी अपसमज प्रचलित झाला. त्यातील बऱ्याच भ्रामक कल्पनांचा आता निरास झाला आहे. कार्बन पद्धतीने केलेल्या अनुमानानुसार खिस्तपूर्व दोन हजार ह्या काळात डेन्मार्क मध्ये अन्नधान्याची शेती व पशु-पालन प्रचलित असे. गुरे गोठ्यात बांधून ठेवली जात व हिवाळ्यात त्याना झाडांचा पाला चारण्यात येई.

उत्तर-ध्रुवाच्या प्रदेशाभोवती पसरलेल्या युरेशियाच्या विस्तीर्ण मुलुखात नव-पाषाण युगामध्ये शेतीस अनुकूल स्थिति नसली तरी रानपक्षी, कवचीदार फळे यांची अरण्यात रेलचेल असे. तेथील अरण्यवासी जन-समूह अन्न-संकलक असत. जलाशयांच्या आसपास मच्छीमारी चाले. आठ-नऊ हजार वर्षे सांस्कृतिक समानतेचे सातत्य टिकून राहिले. पर्यावरणातील देश-कालगत फरकांशी आपली रहाणी जमवून घेण्यासाठी त्यात काही फेरबदल होणे अपरिहार्य होते. हे अरण्यवासी समूह कुत्रे पाळीत. अन्नासाठी पशु पाळले जात नसत. मात्र


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पूर्व स्वीडनमधील शिकारी व मच्छीमार लोक स्थानिक अवलादीची डुकरेही पाळीत. बाल्टिक व श्वेत ह्या सागरांच्या तीरावरील मच्छीमार समूह काही अंशी फिरस्ते असत. तथापि ते मातीची भांडी बनवीत.

भूमध्य सागर व अटलांटिक महासागर यांच्या किनाऱ्याशी युरोपातील दूरच्या प्रदेशाना जोडणारे जुने खुष्कीचे मार्ग आढळतात. त्या मार्गांच्या जवळपास जागोजागी पुंजक्या पुंजक्यानी कित्येक थडग्यांचे अवशेष सापडले आहेत, त्यावरून असे अनुमान निघते की पौर्वात्य संस्कृतीचा प्रसार पश्चिम युरोपात काही अंशी जलमार्गाने झाला असावा; थडग्यातील वस्तु पहाता ती एकाच संस्कृतीच्या अगर एकाच वांशिक परंपरेच्या समूहानी बांधलेली नाहीत असे दिसते. मात्र थडग्यांच्या आकार-प्रकारात व बांधणीच्या पद्धतीत बराच सारखेपणा आहे. विशाल पाषाण खंड एकमेकावर रचून उभारलेली थडगी विशेष कुतूहल–जनक होत. हे बांधकाम पाण्याचा वापर न करता झालेले आहे. छोट्या आकाराचे दगड रचूनही असेच निर्जल बांधकाम करण्यात आले आहे. जमिनीत खणून किंवा टेकड्या खोदून तयार केलेल्या थडग्यांचीही रचना दगड रचून केलेल्या थडग्यांसारखीच आहे. सज्जा थडगे व गल्ली थडगे असे थडग्यांचे दोन मुख्य प्रकार सर्वत्र आढळतात. गल्ली थडग्याची रचना अशी असते की, आत जाण्यास अरुंद वाट केलेली असते. सज्जा थडग्यात जाण्यास वेगळी वाट नसते; थडग्याचा आकार लांबट असतो, व एकीकडे दार असते. गल्ली थडगी अधिक प्रमाणात आढळतात. विशाल पाषाण-खंडांच्या कसल्याही थडग्यास ढोबळपणे डॉल्मन हे नामाभिधान वापरले जाते. वस्तुत: डॉल्मन हे लंब-चौकोनी आकाराचे, व विशाल पाषाणाचे तीन ते सहा खांब असलेले, वेगळा प्रवेश-मार्ग नसलेले थडगे होय. मृद्‌घट ( बीकर ) हे वैशिष्ट्य असलेले जन-समूह बव्हंशी सशस्त्र व्यापारी टोळ्या असून ते तांबे, सोने, अंबर इ. वस्तूंचा व्यापार करीत. विविध आकार-प्रकारचे मृद्‌घट ते बनवीत. मृद्‌घट-जनांची हत्यारे, दागिने, अवजारे, मातीची भांडी वगैरे वस्तूंचे अवशेष नव-पाषाण युगाच्या तिसऱ्या व चौथ्या कालखंडातील त्यांच्या थडग्यामध्ये आढळून येतात.

नव-पाषाण युगीन अर्थव्यवस्था समुद्रमार्गे पश्चिमेकडे फैलावत ग्रीस-नंतर अपीनाइन द्वीपकल्पात पोचणे अपेक्षितच होय. सिसिली व दक्षिण इटली-मध्ये नव-पाषाण युगातील वसाहतींमध्ये पशुपालन व अन्न-धान्याची शेती, शिकार, मच्छीमारी, फळांसारख्या अन्नाचे संकलन ही उपजीविकेची साधने होती.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शिकारीसाठी गोफण–गुंडयाविना तत्कालीन दुसरे हत्यार आढळत नाही. युरोपातील सर्वांत जुना नांगर संपूर्णपणे लाकडी होता. अपीनाइन द्वीपकल्पातील पशुपाल डोंगरकपारीतील नैसर्गिक गुहांमध्ये प्रेते पुरीत. कांस्य युगात पाषाणावर केलेले खोदकाम कोठे कोठे आढळते, त्यावरून तत्कालीन विचार व कल्पना यांची काहीशी जाणीव होते. काही जागी योद्धयांची तर कुठे कुठे शांतपणे जमीन नांगरणाऱ्या शेतकऱ्यांची चित्रे खोदलेली आहेत. प्रारंभिक कांस्य युगातील धातु–कामाचे साचेही आढळले. उत्तर इटलीतील संपन्न व संश्लिष्ट संस्कृती विभिन्न परंपरांच्या समन्वयातून साकार झाली होती व तिचा साऱ्या अपीनाइन द्वीपकल्पावर प्रभाव होता.

भूमध्य समुद्राच्या दक्षिण तीरावरील प्रदेशाचे पुरावस्तु–शास्त्रीय संशोधन झालेले नाही. भूमध्य सागराच्या पश्चिम विभागातील बेटात पुरा–वस्तु–शास्त्रीय माहिती उपलब्ध होण्याची शक्यता नाही. माल्टा व गोझा ही बेटे म्हणजे युरोप व आफ्रिका याना एकेकाळी जोडणाऱ्या प्राचीन, नैसर्गिक भूमि–सेतूचे अवशेष होत.

युरोपच्या अटलांटिक महासागराकडील प्रदेशात आशिया व पूर्व यूरोपमधील रहाणीच्या प्रभावाचा फैलाव आयबेरियाई द्वीपकल्पाचे मार्गाने झाला. स्पेन व पोर्तुगालचा एकत्रित प्रदेश प्राचीनकाळी आयबेरिया म्हणून ओळखला जाई. आफ्रिकेतून आयबेरियामध्ये आलेले नव–पाषाण काळातील जन–समूह टेकड्यांवर राहून भोवतालच्या सुपीक खोऱ्यावर नजर ठेवीत. ते धान्याची शेती करीत व गुरे पाळीत. कापणीसाठी गारगोटीचे विळे वापरीत. ते ऑलिव्ह वृक्षाची झाडे लावीत व त्यामुळे एकप्रकारे त्या भूमीस बांधले जात. त्यांच्या झोपड्या गोल किंवा लंब–गोल आकाराच्या असत. धान्य दळण्यासाठी ते जाते वापरीत. लाकुड–कामासाठी दगडी कुऱ्हाडी बनवून त्याना सहाणेवर घासून धारदार बनवीत. ह्या द्वीपकल्पात सोने, चांदी, तांबे, शिसे, कथील ही खनिज संपत्ति विपुल असल्याने उद्योग व व्यापार याना बरकत आली.

हिमयुगात पिरनीजच्या उत्तरेचा, ऱ्हाइनच्या पूर्वेचा आणि आल्प्सच्या सभोवारचा प्रदेश निर्वृक्ष गवती राजाने व्यापला होता. हवामान बदलल्यावर ह्या प्रदेशात सर्वत्र वृक्षांचे वन पसरले. शिकारीवर व मासेमारीवर जगणाऱ्या येथील अन्न-संकलक जनसमूहांचे रूपांतर परकीय नव-पाषाण संस्कृतीच्या प्रसारामुळे अन्न-उत्पादक समूहांमध्ये क्रमशः होत गेले.

भूमध्य सागरामधून कृषीवल जन-समूह गरोन आणि ऱ्होन नदीखोऱ्यांच्या मार्गाने अटलांटिक महासागराच्या तीरावर पसरले गेले. परांसमध्ये बृहत्पाषाण

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

संस्कृतीचे अवशेष आढळतात. अटलांटिक किनाऱ्यावर पाषाण-युगातील जन-समूहांत मृत्यूनंतर दफनाची क्रिया टोलेजंग पद्धतीने व्हावी, मोठमोठी थडगी उभारली जावीत, थडग्यात मंतरलेले ताईत, जडजवाहीर, सोने ठेवले जावे अशी बलवत्तर प्रेरणा असे. त्यासाठी भरपूर संपत्ति कमवावी व राखावी ही अभिलाषा साहजिकच होती. पाषाण, कांस्य, लोह अशी प्रगतीची वाटचाल युरोपच्या अटलांटिक किनाराविभागात चालू राहिली.

ब्रिटिश बेटात अनेक सांस्कृतिक प्रवाह एकवटले. त्या प्रदेशात वसाहत करण्यासाठी अनेक आकर्षणे होती. गवती रानाने सारा प्रदेश पाषाणयुगात व्यापलेला होता. गारगोटी, सोने, तांबे, टिन यांचे तेथे विपुल, नैसर्गिक साठे होते. मध्य-पाषाण युगात या बेटांमध्ये शिकारी व मच्छीमार समूहांची वस्ती होती. उत्तर फ्रांस व बेल्जममधून कृषीवल समूह इंग्लंडच्या दक्षिण विभागात नव-पाषाण संस्कृति घेऊन दाखल झाले. तेथे पूर्वीपासून वस्ती करीत असलेल्या अन्न-संकलक समूहांशी हे अन्न-उत्पादक समूह मिसळले मात्र नाहीत. ब्रिटिश बेटांच्या भौगोलिक रचनेमुळे प्रादेशिक एकरूपता नाही. उत्तर आणि पश्चिम विभागातील प्रदेश पहाडी व पठाराचा आहे. आग्नेयीस सखल मैदानी मुलुख आहे. युरोपखंडातून येणाऱ्या संस्कृति बव्हंशी मैदानी मुलुखात आपल्या पूर्वजांच्या परंपरा संभाळीत राहिल्या. पठाराच्या प्रदेशातील लोकांत ताठरपणे आपले वैशिष्ट्य राखण्याची प्रवृत्ति अधिक असे. युरोपखंडाशी दळणवळण राखण्याच्या नैसर्गिक अडचणीमुळे ब्रिटिश बेटातील संस्कृतीस सीमा निर्माण झाल्या, नव-पाषाण युगात ब्रिटिश बेटातील निवासी गायबैल, शेळ्या-मेंढ्या, डुकरे पाळीत. जमीन कसून पिके काढीत. हरणाची शिकार करीत, कवचीदार फळे व कवचीदार जलचर–कालव जमवीत, दगडावर कोरलेली चित्रे मिळतात. प्रमुख माणसांची प्रेते टोलेजंग थडग्यात पुरली जात. सामान्य माणसांची साध्या खड्यात पुरत. विविध पुरातन अवशेष सापडले आहेत.

पुरा-वस्तूंपासून मिळणाऱ्या त्रोटक माहितीची सावधपणे नीट संगति लावून अनुमाने व निष्कर्ष काढणे बिकट व किचकट काम आहे. भिन्न भिन्न संस्कृतींची स्थल-काल वार विभागणी करावी लागते. मानव समाजाच्या रहाणीच्या रीति-भातीतील विविधतेचे दर्शन पुरा-वस्तु संग्रहात घडते. एकाच काळातील वेगवेगळ्या संस्कृतीचा पट उलगडून पाहिल्यास विविध आकृतींची नकशी दिसून येते, व मध्यंतरीचे कित्येक तुकडे हरवले असल्याचे ध्यानात येते. विलक्षण वैविध्य हे युरोपच्या प्रागितिहासाचे एक ठळक वैशिष्ट्य होय.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आणविक पदार्थ-विज्ञान शास्त्राच्या आधारे विकिरण-कर्ब तंत्राने काल-निर्णयाचा प्रयत्न करण्यात येतो. पण त्यावर विशेष विसंबून रहाता येत नाही. काल-निश्चितीबाबत वास्तविकता काहीही असो; पूर्वेचे प्राधान्य वादातीत आहे. ( सामान्यतः भूमध्य सागर आणि दक्षिण युरोप यांच्या पूर्वेकडील प्रदेश म्हणजे पूर्व असे मानले जाते. ) नव-पाषाण युग-क्रांति नैर्ऋत्य आशियात घडून आली. अन्न-धान्याची शेती व पशु-पालन हे तिचे फलित होय. व तेथून हे फल युरोपात प्रसृत झाले. इजिप्त आणि सुमेर ( बाबिलोनियाचा एक प्रांत ) यांमध्ये नागर क्रांति झाली, व तीन शतकांनी ती डेन्मार्कमध्ये येऊन ठेपली. तांबे वितळवून त्याचे साचे बनवण्याचे तंत्र त्यापूर्वीच इजिप्त आणि मेसापोटे-मिया या देशात कौशल्याने अवलंबण्यात आले होते. तेथून ख्रिस्तपूर्व तिसऱ्या सहस्रकात ते तंत्र भूमध्य सागरासभोवारच्या युरोपीय प्रदेशात फैलावत गेले.

पौर्वात्यांकडून युरोपीय जन-समूहाना जे नवे ज्ञान मिळाले त्याचा वापर ते निमूटपणे, ठोकळेबाज पद्धतीने करीत राहिले, असे मात्र मुळीच नव्हे. उलट, इजिप्त मधील व लगतच्या आशियाई प्रदेशातील मूळ संशोधकांच्या प्रत्यक्ष वारसदारांहून जास्त शोधक बुद्धि, नाविन्याचे कसब वापरून युरोपीय जन-समूहानी संशोधनाच्या विकासाला मोलाचा हातभार लावला. युरोपचे हवामान हिमयुगापेक्षा सौम्य झाल्यावर सुरू झालेल्या कांस्य युगात तर ही वस्तुस्थिति विशेषच ठळकपणाने प्रत्ययास येते. समीप पूर्वेच्या प्रदेशात धातूंची कित्येक प्रकारची अवजारे फेरबदल विशेष न होता दोन हजार वर्षे वापरात होती. पण इकडे समशीतोष्ण हवामानाच्या युरोपात मात्र पाचशे वर्षे हत्यारे, अवजारे, उपकरणे यांचे कित्येक नवे नवे आकार–प्रकार तयार होत होते; त्यात गुंतागुंतीचे बारकावे आणण्याचा प्रयत्न चालू होता.

युरोपच्या प्रागैतिहासिक काळातील प्रगतीच्या ह्या अचंबा वाटणाऱ्या वेगाची कारण–मीमांसा करताना तेथील भूमीतच काही जादुगिरी आहे, अगर तेथील मानव–वंशाच्या रक्तातच अद्भूत गुणधर्म आहेत, असे समजणे भ्रामक होय. त्याची कारणे सामाजिक व ऐतिहासिक आहेत. युरोपला निसर्गतः कित्येक सुखसोयी लाभल्या आहेत. सागर–तीर अतिशय दंतुर आहे. पर्वतराजींना हवे तसेच अनुकूल स्थान मिळाले आहे. नद्यांचे प्रवाह नौका–नयनास उपयुक्त आहेत. तांबे, कथिल व कित्येक मूल्यवान धातूंच्या खाणी जागोजाग आहेत. दर्यावर्दी मुशाफिरीचे शिक्षण घेण्यास अत्युत्तम असा भूमध्य सागर आहे. आणि निसर्गाच्या ह्या वरदानाचा सृजनशीलतेने पुरेपूर लाभ घेणारे जन–समूह होते.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पाणी-पुरवठा व कसणुकीसाठी जमीन ह्या दोन्हीच्या विपुलतेमुळे प्रारंभिक नव-पाषाण युगातील कृषीवल जन-समूहांच्या लोकसंख्येच्या वाढीवर कसलाही निर्बंध नव्हता. बारमाही नद्यांच्या तीरावरील चिंचोळ्या प्रदेशात घनदाट लोकवस्ती होणे स्वाभाविक होय, दाट वस्तीच्या समूहाना करड्या शिस्तीची गरज असते. युरोपातील समूहाना कसणुकीसाठी नवी नवी जमीन लागवडीत आणून जाचक परंपरेच्या काचातून निसटणे नेहमीच शक्य असे. नव-पाषाण युगात समूहांच्या स्वयंपूर्णतेमुळे भिन्न भिन्न परंपरा व समाजाची पृथक् घडण याना पर्यायाने प्रोत्साहन मिळाले. समीपवर्ती आशियाई प्रदेशात हलाफियन व उबेद अशा संस्कृतींचा प्रसार विस्तीर्ण क्षेत्रात एकामागून एक व एकरूपतेने होत गेला. युरोपात अशी सांस्कृतिक एकरूपता नव्हती. नव-पाषाण युगातील युरोपीय जन-समूहांत भिन्न भिन्न परंपरांचे बाहुल्य होते. तथापि ते परस्पराहून संपूर्णपणे अलग होते असे मात्र नव्हे. ह्या कृषीवल समूहाना तुलनेच्या आधारे मुक्तपणे निवड करण्याची संधी उपलब्ध असे. मध्य-पाषाण युगीन समूहातही विविध परंपरा रूढ झाल्या होत्या. ते समूह नव-पाषाण युगीन समूहात आत्मसात होऊन गेले, अथवा त्यानी नवे तंत्र स्वीकारले. सांस्कृतिक बहुरूपतेचे हेही एक कारण होय.

आशिया व आफ्रिका खंडांतील नाइल, टायग्रिस-युफ्राटिस, सिंधु यां-सारख्या नदी-खोऱ्यांतील जल-सिंचनाच्या शेतीतील उत्पन्नाचा वाढावा सरदार-पुरोहित वर्गाच्या हाती सांचत राहिला. युरोपच्या इजियन सागरातील द्वीप-समूहातील शेतकरी व मच्छीमार समूहाना या संचित संपत्तीत वाटा मिळू लागला. कारण इजिप्त व मेसापोटेमियातील शासकांमध्ये युद्धाची प्रवृत्ति वाढीस लागून त्यासाठी हत्यारे बनवण्याकरता कणखर धातूंची मागणी वाढली. इजि-यन समूहाना वाढाव्यात हिस्सा मिळाला, पण त्यासाठी राजकीय एकीकरण आणि वर्ग-विभागणी या स्वरूपात द्यावी लागणारी किंमत मात्र चुकवावी लागली नाही. क्रीटबेटातील ख्रिस्तपूर्व ३००० ते ५००० या काळातील मिनो-अन संस्कृति आणि ग्रीस देशातील मायसीनिआ हेलन-पूर्व राज्य यांजमध्ये सोने, अंबर, टिन ह्या खनिज वस्तूना मागणी असे. त्यामुळे मध्य युरोप आणि ब्रिटिश बेटे यांतील बर्बर जन-समूहाना नागरी क्रांतीच्या योगे संचित झालेल्या भांडवलात वाटा मिळू लागला व खनिजांपासून धातु आणि शस्त्रे बनविणे तसेच त्यांचे वितरण करणे अशासारख्या उद्योगांच्या वाढीसाठी त्याना साधन उपलब्ध झाले. मात्र त्यासाठी नागरी संस्कृतीबरोबर अवश्यंभावी असलेली


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

करडी शिस्त आणि वर्ग-भेद कळा सोसण्याची मात्र त्यांच्यावर पाळी आली नाही. कुशल कारागीरांचा वर्ग अन्नोत्पादनाच्या जखडून टाकणाऱ्या कामातून मोकळा झाला, कारागीर लोक आपला माल व मेहनत गिऱ्हाइकाना विकीत असले तरी त्यांचेवर आधारासाठी कोणी सरदार-मिरासदार, मंदिराचा महंत यांच्या तोंडाकडे लाचारीने पहाण्याचा प्रसंग नसे. त्यांच्या मेहनतीस मागणी विपुल व हमखास असल्याने चढाओढ चाले. कारागीराना शोध-बुद्धी व कसब प्रकट करण्यास सर्वत्र प्रोत्साहन मिळे न त्यांचे सर्वत्र स्वागत होई. वस्तुतः युरोपच्या कांस्ययुगातील धातु-कारागीर तत्कालीन अंतर्राष्ट्रीय बाजार-पेठेसाठी माल बनवीत. प्राचीन पौर्वात्य नागरी क्रांतीमुळे भौतिक प्रगतीचे अग्रदूत असणाऱ्या कारागिराना समाज-रचनेत निकृष्ट खालचे स्थान मिळाले. प्रागैतिहासिक युगातील युरोपात मात्र कारागीराना गुलामांच्या किंवा शूद्रांच्या दर्जात कदापि ढकलण्यात आले नव्हते.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | किंमत |
|---|---|---|
| (१) | धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | १२०.०० |
| (२) | धर्मकोश– उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | २२५.०० |
| (३) | धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला | ७०.०० |
| (४) | मीमांसाकोश भाग १ ते ७ (संपूर्ण) | ३५०.०० |
| (५) | कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश | १०.०० |
| (६) | बौद्धागमार्थसंग्रहः | ३०.०० |
| (७) | स्मृतिमुक्ताफलम् (वैद्यनाथ) (वर्णाश्रमधर्म, आह्निक, आशौच, श्राद्ध, काल, आणि प्रायश्चित्त) | ५०.०० |
| (८) | दीपकलिका (शूलपाणि) (याज्ञवल्क्यस्मृतिटीका) | १०.०० |
| (९) | धर्मद्वैतनिर्णय (शंकरभट्ट) | १०.०० |

## मराठी

| | | |
|---|---|---|
| (१) | वैदिक संस्कृतीचा विकास (तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी) | ३०.०० |
| (२) | भावार्थ रामायण (श्री एकनाथ महाराज कृत) बालकांड | १२.०० |
| (३) | इतिहासाचे तत्त्वज्ञान (प्रा. सदाशिव आठवले) | १०.०० |
| (४) | क्रोचेचे सौंदर्यशास्त्र (अनु. डॉ. रा. भा. पाटणकर) | १०.०० |
| (५) | सिंधु संस्कृती, ऋग्वेद व हिंदु संस्कृती (प्र. रा. देशमुख) | १०.०० |
| (६) | पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास (डॉ. सुमंत मुरंजन) | ८.०० |
| (७) | चार्वाक–इतिहास आणि तत्त्वज्ञान (प्रा. सदाशिव आठवले) | ६.०० |
| (८) | मानवाचा आदर्श | ६.०० |
| (९) | नवमानवतावाद | ५.०० |
| (१०) | गीता-प्रवेश (डॉ. गो. वि. देवस्थळी) | ५.०० |
| (११) | लोकशाहीचे धोके (श्री. पन्नालाल सुराणा) | ४.०० |
| (१२) | भारतीय स्त्रीधर्माचा आदर्श (सौ. कमल पाध्ये) | ४.०० |
| (१३) | हिंदी साहित्यविचार (प्रा. पॅरेलाल गोहेल) | ३.०० |
| (१४) | महाराष्ट्रातील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना (श्री. चा. अ. दाभोलकर) | २.०० |

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई